लढून तुला सोडवूं शकत नाहीं '. तेव्हां कामधेनूनें आपल्या अंगापासून म्लेंच्छ, यवन, शबर, शक निर्माण केलें व त्यांनीं विश्वामित्राचें सैन्य झोडपून काढून कामधेनूची मुक्तता केली. या ठिकाणीं वसिष्ठाच्या ' शांती 'चे गोडवे गाण्यासारखें काय आहे ? कामधेनूची मुक्तता अखेरीस तिनें निर्माण केलेल्या सैन्याच्या पराक्रमानेंच झाली; शांतीनें झाली नाहीं. द्रौपदीच्या वस्त्रहरणाची निष्कृति भीमानें दुःशासनाचा कंठनाळ चिरूनच केली. भक्त प्रल्हाद याची सुटका हिरण्यकशिपूचें पोट फाडून त्याला यमलोक दाखविल्यावरच झाली. याचप्रमाणें कोठलीहि कथा घ्या. तींत आत्मबल, अहिंसा, शांति इत्यादि साधनांनीं दुष्टांच्या दुष्कृत्यांची कड लावली गेली नसून देहान्तशासनानेंच त्यांची तड लावली गेली आहे.

योगी अरविंदबाबू यांनीं हाच सिद्धान्त आपल्या गीतेवरील निबंधांतील ' कुरुक्षेत्र ' या प्रकरणांत सविस्तर मांडला आहे व श्री. देव यांनीं त्यांतील निष्कर्ष मान्य केला आहे. एवढेंच नव्हे तर, अर्वाचीन संतमंडळींनींहि व्यवहाराचा धर्म मोक्षधर्माहून वेगळा मानला आहे. वैयक्तिक जीवन व सामाजिक जीवन असा भेद त्यांनीं सदैव डोळ्यांपुढें ठेवला. अशा रीतीनें गीतेपासून तों तुकाराम—रामदासांपर्यंत सर्वांनींच लो. टिळकांच्याप्रमाणें व्यवहारांत व राजकारणांत सत्य व अहिंसा हे सद्‌गुण निरपवाद पाळतां येत नाहींत हें मान्य केल्यावर, गांधीजींचे सत्याचे प्रयोग व्यवहाराला लागू पडूं शकत नाहींत, हें ओघानेंच सिद्ध झालें. पण हें मान्य करणें जिवावर येऊन श्री. देव हे लिहितात कीं, 'या सृष्टींतहि मानवी प्राणी केव्हां तरी पूर्णावस्थेला जाऊन धर्मानें व्यवहार करूं लागणार; त्याकरितां सम्यग् मार्ग शोधून काढला पाहिजे. याकरितांच अरविंदबाबूंनीं साधना केली आणि गांधीजींचे प्रयोगहि त्याकरितांच चालले होते. ही पूर्णावस्था येण्याला कदाचित् शेंकडों, हजारों वर्षे जातील. पण अशी पूर्णावस्था प्राप्त होईल, अशी श्रद्धा बाळगून तिच्याकरितां प्रयत्न करणें हें श्रेयस्कर होय.'

**कल्पित भविष्यकाळासाठीं आदर्श**

अर्थातच आजच्या व्यवहाराच्या प्रश्नांतून हळूच अंग काढून घेऊन, हजारों वर्षांनीं कदाचित् प्राप्त होणाऱ्या पूर्णावस्थेसाठीं निरपवाद सत्य व अहिंसा यांचा उपदेश आहे, असें श्री. देव यांनीं स्वतःच मान्य केल्यानें हा वाद येथेंच संपतो. गीताकार, महर्षि व्यास, ज्ञानेश्वर, तुकाराम, रामदास इत्यादि संत आणि लो. टिळक हे आपापल्या काळांतल्या विद्यमान पिढीसाठीं व्यावहारिक सन्मार्ग सांगत आहेत व तो सांगतांना त्यांनीं सत्य व अहिंसा यांना अपवाद मानले हें व्यवहाराला धरूनच झालें. गांधीजी हे भविष्यकाळांतल्या कल्पित मानवी समाजासाठीं पूर्णावस्थेचे धडे देत आहेत. त्या वर्गांत बसण्याची इच्छा पूर्ण होण्याची वेळ आल्यावर आम्हीहि त्यांचा निरपवाद मार्ग मान्य करूं. पण तशी संधि येण्यापूर्वीं आजच्या संघर्षांत जगावयाचें कसें, हा जगापुढें प्रश्न आहे. या प्रश्नाचें उत्तर गीतेनें, लो. टिळकांनीं आणि महाराष्ट्रीय साधुसंतांनीं जें दिलें आहे, तेंच पटण्यासारखें व श्रेयस्कर आहे. कल्पित परिस्थितींतलें कल्पित उत्तर बरोबर आहे का चूक आहे याचा तात्त्विक वाद केला तरी, ज्या उत्तराचा ताळा पाहतां येत नाहीं, त्या उत्तराच्या खरेखोटेपणाविषयीं काथ्याकूट कशाला ? लो. टिळक हे आजच्या समाजाला उत्तम मार्गदर्शन करीत आहेत; गांधीजींचा उपदेश सध्यांतरी समाजाला लागूच नाहीं; मग तो गीतेच्या पुढें का मागें या शाब्दिक वादांत अर्थ काय ? आजच्या पिढीला गांधीजींच्या उपदेशांत प्रकाश दिसत नसून अंधारच दिसतो.

आपद्धर्म, कणिकनीति, कूटव्यवहार, जशास तसें हा न्याय आणि सद्धर्माचे अपवाद यांची चर्चा केल्यास सद्धर्मावरील दृष्टि ढळून अपवाद हाच नियम होऊन बसेल, अशी जी शंका आक्षेपकांनीं दर्शविली आहे, ती शंका शास्त्रकारांना व आधुनिक ग्रंथकारांना आली नव्हती असें नाहीं. महाभारतकारांनींच याविषयीं किती दक्षता घेतली आहे ती पाहा. आपद्धर्म सांगण्यापूर्वीं भीष्म धर्मराजाला बजावतात कीं,

उपायं धर्मबहुलं यात्रार्थं शृणु भारत ।
नाद्दमेतादृशे धर्मे बुभूषे धर्मकारणात् ॥

" लोकव्यवहारासाठीं ' उपाय ' म्हणून मी हा मार्ग तुला सांगतों, तो ऐक. हा मार्ग ' धर्मबहुल ' आहे, शुद्ध धर्म नव्हे, आणि धर्मोपदेशास्तव म्हणून मी हा

असला (शबल) धर्म सांगण्याची इच्छा धरीत नाहीं." त्यानंतर कणिकनीति सांगितल्यावर भीष्म म्हणतात : 'राजानें शत्रूचें कपट ओळखण्यासाठीं ही नीति शिकावी, स्वतः आपणच दुसऱ्यास फसविण्यासाठीं या कुटिल नीतीचा प्रयोग करूं नये.' कौटिल्यानें अर्थशास्त्रांतहि अनेक कुटिल उपाय सांगून शेवटीं असा इशारा दिला आहे कीं, 'हे कुटिल उपाय आत्मसंरक्षणार्थ आहेत, चांगल्या राजानें दुसऱ्यास फसविण्याकरितां यांचा अवलंब करूं नये.' 'जशास तसें' या न्यायांतहि दुसऱ्यानें आधीं आगळीक केली तर मग त्याच्या प्रतिकारार्थ कसें वागावें तें सांगितलें आहे. कपटनीतीचा 'श्रीमन्महा' आपणच आधीं करावयाचा नसतो. दासबोधांतहि कपटी शत्रूचें आचरण पारखतां यावें म्हणून कपटनीतीचीं लक्षणें सांगितलीं आहेत, स्वत: तसें आचरण करण्यासाठीं नव्हे, असा इशारा देऊन ठेवलाच आहे. 'किरातार्जुनीयां'तहि 'भवन्ति मायाविषु ये न मायिन:' म्हणजे दुसऱ्यानें कपट केलें असतां त्याच्यावर जे तें कपट उलटवूं शकत नाहींत, त्या मूर्खाचा पराभव होतो, असें म्हटलें आहे. आणि 'गीतारहस्यां'त टिळकांनीं हे सर्व उतारे देतांना त्या त्या ठिकाणीं हे अपवाद प्रतिकारार्थ आहेत, नित्यधर्म म्हणून नव्हत, असेंच सांगितलें आहे. इतकी दक्षता घेऊन समाजाच्या हितार्थ म्हणून जे उपाय सांगितले, त्या उपायांनीं समाज अधोगतीला जातो असा आक्रोश करणें, हें दांभिकतेचें लक्षण होय. वास्तविक पाहातां या ठिकाणीं भाषेंतील शब्दांची उणीवच नडते, असें मीं माझ्या मूळ लेखांत दाखविलें होतें. त्या शंकेला कोणीहि उत्तर दिलें नाहीं अथवा नवे शब्द सुचविले नाहींत. व्यवहारांत मुलीच्या रूपाचें वर्णन करण्याला गोरी व काळी हे दोनच शब्द रूढ आहेत. हें भाषा-दारिद्र्य होय. कारण, शेंकडा ९० मुली केवळ गोऱ्या नसतात किंवा केवळ काळ्या नसतात. अशा परिस्थितींत एखाद्यानें मोघमपणें 'आम्हांला मुलगी गोरी असेल तर पसंत, काळी असेल तर नापसंत', असा नियम सांगून ठेवल्यास व्यवहार कुंठितच होईल. त्याचप्रमाणें 'केवळ सत्य व अहिंसा ग्राह्य, असत्य व हिंसा त्याज्य; केवळ धर्म ग्राह्य, अधर्म अग्राह्य' असा नियम सांगितल्यानें व्यवहार अडूनच राहातो. कारण सत्य व असत्य, हिंसा व अहिंसा धर्म व अधर्म यांच्या दरम्यान इतक्या विविध सूक्ष्म छटा आहेत कीं, त्यांना केवळ हें किंवा तें एकच नांव देतां येत नाहीं. हीच अडचण गीतेनें 'किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः' या श्लोकांत व्यक्त केली आहे. यालाच अनुसरून महाभारतांतहि शांतिपर्वांत,

अधर्मरूपो धर्मो हि कश्चिदस्ति नराधिप ।
धर्मरूपो ह्यधर्मश्च तच्च ज्ञेयं विपश्चिता ।।

असें सांगितलें आहे. वरकरणी धर्म भासला, तरी तो अधर्म (समाजघातक) असूं शकतो; त्याच्याउलट बाह्यतः एखादें कृत्य अधर्माचें वाटलें, तरी त्यापासून समाजाचें कल्याण साधणारें असल्यानें तें कृत्य धर्मरूप असतें. असल्या या बाह्य रूपाहून अन्तर्गत रूप वेगळें असणाऱ्या बाबींचा विचार श्री. देव यांच्या लेखांत मुळींच नाहीं. म्हणजे खरे जे अडचणीचे प्रश्न ते टाळून नुसत्या सत्यासत्य, हिंसा-अहिंसा या दोन खुंटांच्या भोंवतीं ते घिरट्या घालीत आहेत; परंतु अशा घिरट्या कितीहि घातल्या तरी डाव जसा संपत नाहीं, त्याप्रमाणें पेंचप्रसंगाचें कोडें उलगडत नाहीं.

## दोन धर्मांतील विरोध

दुसरा एक वादाचा मुद्दा त्यांनीं अजिबात टाळला आहे. तो मुद्दा म्हणजे दोन धर्मांतीलच झगडा हा होय. सत्य व असत्य, अहिंसा व हिंसा, धर्म व अधर्म या जोड्यांतून पहिली ग्राह्य, दुसरी अग्राह्य, हें आपाततः तरी सांगतां येतें. पण जेथें धर्म व अधर्म असा विरोध नसून, दोन धर्मांतच विरोध येतो, तेथें कोणता तरी एक धर्म टाकून दुसऱ्याचा अवलंब करावा लागतो. अशा ठिकाणींहि एका धर्माचा त्याग करावा लागतो. असें म्हणतांच धर्म टाकून अधर्माची कांस धरण्याला सांगितलें, असा आक्षेप श्री. देव हे घेणार काय ? मातेची आज्ञा पाळणें हाहि धर्म व पित्याची आज्ञा पाळणें हाहि धर्मच; परंतु माता व पिता यांनीं परस्परांविरुद्ध आज्ञा दिल्या, तर मुलानें काय करावें ? पित्राज्ञा आणि राजाज्ञा यांत विरोध आल्यास एका आज्ञेचा अव्हेर करावाच लागणार ना ? श्रीरामालाच असें कोडें पडलें कीं,








पतिधर्म आणि प्रजापालनधर्म या दोहोंतून कशाला अधिक महत्त्व द्यावें ? श्रीरामानें राजा या नात्यानें प्रजापालनधर्म अधिक श्रेष्ठ मानला; पण त्याकरितां त्याला नांवें ठेवणारे शेंकडों आक्षेपक आहेत. आणि समजा कीं, त्यानें स्त्रीदाक्षिण्य आणि पतिधर्म श्रेष्ठ मानून सीतेचा त्याग केला नसता, तरी देखील त्याला राजधर्माचें उल्लंघन केल्याबद्दल दूषण देणाऱ्या लोकांची संख्या कांहीं कमी भरली असती असें नाहीं.

असाच विरोध राष्ट्र किंवा समाज यांचें कर्तव्य आणि कौटुंबिक कर्तव्य या दोहोंमध्यें येतो. आद्य श्रीशंकराचार्य यांनीं धर्मकार्यार्थ संन्यास स्वीकारण्याचें ठरविलें, त्या वेळीं मात्राज्ञा आडवी आली. श्रीसमर्थांनाहि तीच अडचण भासली. या उभयतांनींहि मातेची एक प्रकारें प्रतारणा करूनच संसारशृंखला टाळली. त्यावरून त्यांना सत्यधर्म अमान्य होता व त्यांनीं असत्यधर्माचा पुरस्कार केला, असें समजावयाचें काय ? गांधीजींनीं देखील सत्याग्रहाच्या कर्तव्यापायीं दूध न पिण्याची प्रतिज्ञा मोडलीच कीं नाहीं ? दुसरें उदाहरण द्यावयाचें झाल्यास दांडी-प्रवासाचें देतां येईल. दांडीला समुद्रतीरावर जाऊन त्यांनीं कायद्याविरुद्ध तेथील मीठ 'चोरलें' आणि स्वतः 'निमकचोर' असल्याची शेखी मिरविली. त्याच सत्याग्रहांत लो. ना. बापूजी अणे यांनीं सरकारी जंगलांतील गवत परवानगीविना तोडून आपल्यावर 'गवताच्या चोरी'चा आळ ओढून घेतला व त्यांस 'गवत चोर' म्हणूनच शिक्षा झाली. धर्मराजाच्या 'नरो वा कुंजरो वा' या वाक्यानें जर जगांत सत्यधर्माचा लोप होऊन असत्यधर्म बोकाळला असें मानावयाचें, तर 'निमकचोरी' व 'गवतचोरी' यांच्या उदाहरणानें चोरी करण्याची प्रवृत्ति समाजांत वाढेल असें कां मानूं नये ?

## शुद्धबुद्धीचें महत्त्व

सारांश, या सगळ्या विरोधांत, पेंचप्रसंगांत व अपवादांत कर्त्याची शुद्धबुद्धि हीच धर्माची कसोटी होय; आणि तशी शुद्धबुद्धि हीच साधनशुचिता होय.

माणसांची नीतिमत्ता सुधारण्याला त्यांच्या बुद्धीला शुद्ध वळण लागलें पाहिजे. बाह्यतः शुद्ध भासणाऱ्या कर्मांची बाह्येंद्रियांकडून तालीम करून घेतल्यानें मनुष्याच्या बुद्धीला चांगलें वळण लागलें असें मानणें चुकीचें होय. कारावासांतील कडक बंदोबस्तामुळें तेथें चोरी, खून, व्यभिचार न करतां दहा दहा वर्षें 'शुद्धाचरणी' राहिलेले अट्टल सोदे तुरुंगांतून बाहेर पडल्यावर दहा दिवसहि गुन्हा न करतां राहात नाहींत. कारण, त्यांच्या बुद्धीवर शुद्ध संस्कार झालेला नसतो. कारावासांत केवळ कायिक शुद्धतेकडेच लक्ष पोंचविलें जातें, त्याचा हा परिणाम होय. समाजांत मानसिक व बौद्धिक शुद्धतेच्या कसोटीवरून मनुष्याचा भलेपणा पारखला जातो. कर्माचें बाह्य स्वरूप श्रेष्ठ का अंतःस्वरूप (मानसिक व बौद्धिक स्वरूप) श्रेष्ठ, असा प्रश्न निघाल्यास कोणीहि अंतःस्वरूप श्रेष्ठ असेंच उत्तर देईल. कायिक, मानसिक व बौद्धिक शुद्धता ही जर एकाहून एक अधिक श्रेष्ठ, तर बौद्धिक शुद्धतेबरोबर प्रसंगवशात् कायिक शुद्धता न साधली, तरी तो दोष मानतां येणार नाहीं. कारण, अंतःस्वरूपांत व बाह्य स्वरूपांत व्यवहारांत अनेक वेळां उघड विरोध असतो. यास्तवच भारतकारांनीं

> अकार्यमपि कार्यार्थे क्रियते यत्र कर्मसु ।
> एतस्मिन् कारणे कर्ता न दोषं प्राप्तुमर्हति ॥

असें म्हणून सत्कार्य साधण्यासाठीं तदन्तर्गत एखादें अकार्य केलें तरी दोष लागत नाहीं, असें म्हटलें आहे.

श्रीमद्भगवद्गीतेच्या १७ व्या अध्यायांत यज्ञ, दान, तप हीं कार्यें 'सत्कार्यें' आहेत असें म्हणून 'कर्म चैव तदर्थीयं सदित्येवाभिधीयते' या वचनानें यज्ञ, दान, तप इत्यादि सत्कार्यें घडवून आणण्यासाठीं तदंशभूत जें जें कर्म तेंहि 'सत्' मानलें जातें, असा निर्णय दिला आहे. अर्थातच या सगळ्यांत कर्माच्या बाह्य स्वरूपापेक्षां शुद्धबुद्धीच्या कसोटीलाच गीतेनें प्रमाण मानिलें आहे. टिळकांनींहि शुद्धबुद्धि हेंच सदाचरणाचें व नीतीचें अधिष्ठान मानलें आहे. हें अधिष्ठान स्वच्छ, निर्मल असावें असा आग्रह धरणारे टिळक हे साधनशुचितेचें महत्त्व प्रतिपादीत नाहींत आणि कर्माच्या बाह्य स्वरूपाकडेच लक्ष देणारे आक्षेपक मात्र साधनशुचितेचें महत्त्व जाणतात, असें प्रतिपादणें हा विपरीत न्याय नव्हे काय ?








# निसर्गांतली मौज मजेची

उषेच्या रम्य हासाचें गुलाबी उगवतें कोडें ।
गगनिंच्या गूढ मोदानें तयाचें बाळसें वाढें ॥

● ● ●

ऊठ कन्हय्या, पूर्वरंगणीं श्रीमंगल उगवलें ।
कुणींतरि दिक्कुंकुम उधळलें ।
सृष्टिचें संवेदन रुचिरलें ।
मनोगत विश्वाचें विकसलें ।
पर्वमय प्राभातिक पसरलें ।
स्नान करायां मानसतीरीं ऋषिमंडळ उतरलें ॥

चतुर किशोरा, ऊठ आळशा, अजुनि किती झोपशी ।
कालगति फसवी कां समजशी ? ।
निसर्गांतली मौज मजेची वायां कां दवडशी ? ॥

बालभानुचीं सुवर्णकिरणें चंचुपुटीं कवळुनी ।
वायुवर पंख मुदें पसरुनी ।
गीतमृदु क्रीडारव उधळुनी ।
हरित सारिका गिरक्या घेती हर्षसुरा सेवुनी ॥

कुसुमासव सेवुनी रमूं तत्सुगंधसौख्यावरी ।
बसुनिया फूलपांखरावरी ।
रुंजी घालूं सलज्ज सुंदर मधुर रहस्यावरी ॥

ऊर्ध्वमूल अश्वत्थ उगवतो विश्वावरणावर ।
विकसतो गोलाकारावर ।
विद्युत्स्पंदनपुंज विलसती उडुगणवृत्तीवर ॥

विद्युत्स्पंदन कुजबुज करितें पिप्पलवृक्षांतरीं ।
निर्मितें अग्निबोध अंतरीं ।
परम दीप्तिचे बोल उभवितें यज्ञभूमिकेवरी ॥

कांतिकुंज झमकती कोवळ्या दळसंभारांवर ।
लोंबती रत्नांचे लोंगर ।
झुलविती मौजेचें झुंबर ।
डुलविती सौंदर्यें सुंदर ।
निर्मिती अतिमानुष मर्मर ।
ललित कल्पना लहरित होती मनस्तरंगांवर ॥

पिंपळपानांमधली सळसळ विशिष्ट वाटे मला ।
अलौकिक धर्म दिसतसे तिला ।
चलदलगर्भित बीजमंत्रगुण बुद्धाला दीधला ॥

विश्वकिरणमय धून उसळते मूल वस्तु डोलतां ।
जिव्हाळी कांतिरम्य पसरतां ।
परब्रह्मेच्या सौंदर्याची रसवंती वहरतां ॥

मूलशक्तिगत सद्वस्तूची जड संसृति बनतसे ।
तियेला विद्युत् संज्ञा असे ।
शरीरहि विद्युत्कम्पद असे ।
जीव ही विद्युत्संस्कृति असे ।
शरीरांतल्या व्यापारीं तो भावांकित होतसे ॥

अस्तित्वांताचे वावरणाऱ्या नील कीलकांवरी ।
प्रकृतिच्या स्पर्शोज्ज्वलतेवरी ।
शांतिच्या कांतिमंगलावरी ।
अहंला रमवुनि उन्मनभरीं ।
विलासप्रसू प्रवास अपुला उरकूं सुखनिर्भरीं ! ॥

—रा. ल. गुप्ते

श्री. रा. ल. गुप्ते

# काव्याची प्रेरणा

The study of sciences extends the range of poetic study and enriches verse with fresh images. It increases intellectual confidence and self-respect of understanding. It opens every door of the soul to all sorts of knowledge and all sorts of feelings. —John ( Viscount ) Morley.

There are only two things really worth living for—the glory and beauty of Nature, and the glory and beauty of human love and friendship.
—Edward Carpenter.

तैत्तिरीय[1] ब्राह्मणांत अशी एक कल्पना आहे कीं, देवगायक गंधर्व हे वडांच्या व पिंपळांच्या झाडांवर बसून वीणा आणि झांजा वाजवीत असतात. परंतु, वनांतल्या वनदेवींना रिझविणाऱ्या वायुवीचींचा सुवासिक व वीर्यजनक गुलकंद सेवन करण्याकरितां मी उषःकालीं सहल करावयाला जात असें, त्या वेळीं मला गंधर्वांच्या ऐवजीं प्रातःश्रीचें अभिनंदन करणारीं नाना प्रकारचीं पांखरें मात्र आढळत. म्हणून ‘ आवडतें तेंच सुदैवानें मिळतें ’ असें समजून मीं अत्यंत प्रेमभरानें चिमणीं चिमणीं चिमणगाणीं म्हणणाऱ्या चिमण्यांच्या संगतींत प्रातःस्मरण उरकलें; टोळ्याटोळ्यांनीं उडणाऱ्या पोपटांचीं सुमधुर संभाषणें ऐकलीं; बुलबुल-साळुंक्यांचा कोलाहल-सुंदर हर्षोन्मत्ततेचा बेभान धिंगाणा कौतुक-दृष्टीनें अवलोकन केला; हिरव्या चतुरिका, निळ्या मंजुलिका व इतर देवपांखरें यांच्या आनंदकल्लोळांच्या बाजारांत स्वर्गीय सल्लामसलत खरेदी केली आणि कधीं पांखरांच्या किलबिलाटांनीं पंख फुटलेल्या कल्पनांवर आरूढ होऊन, तर कधीं ज्योतिर्मय प्रसन्नतेच्या हृदयंगम संस्कृतीवर तरंगत तरंगत

---

१ वऱ्हाडांतील सुप्रसिद्ध संत वैकुंठवासी गुलाबरावमहाराज यांचे एक शिष्य बुलढाण्याचे श्री. रामचंद्र लक्ष्मण गुप्ते यांनीं ‘ निसर्गोपनिषद् ’ नांवाचें एक खंडकाव्य लिहिलें असून तें प्रकाशनाच्या वाटेवर आहे. प्रस्तुत लेख हा श्री. गुप्ते यांनीं आपल्या ‘ निसर्गोपनिषदा ’ला लिहिलेली प्रस्तावना आहे. श्री. गुप्ते यांची दृष्टि शास्त्रीय आहे. आधुनिक शास्त्रीय भौतिक दृष्टिकोनांतूनहि निसर्गाच्या रमणीयत्वाचें आवाहन कसें अबाधित टिकूं शकतें, विज्ञानशास्त्रांची प्रगति काव्यप्रेरणेच्या आड न येतां उलट ती काव्याला कशी पोषक होऊं शकतें याचें स्पष्टीकरण करण्याचा श्री. गुप्ते यांनीं केलेला हा प्रयत्न ‘ नवभारता ’च्या वाचकांस निःसंशय उद्बोधक वाटेल.—श्री. गुप्ते यांच्या ‘ निसर्गोपनिषदां ’तील एक कविता या अंकांत स्वतंत्र छापली आहे, त्यावरून त्यांच्या काव्यशैलीची वाचकांस कल्पना येईल. —का. संपादक

सृष्टिसौंदर्याच्या तीर्थयात्रा केल्या. तिथें मला सृष्टीचें चारित्र्य दिसलें, तिचे अंतर्नाद ऐकूं आले, हृद्गत उमजलें. या सुगाव्यांच्या अनुसंधानांनीं निष्पन्न होणाऱ्या पुण्यांशांतल्या कांहीं ऊर्मी मीं येथें शब्दांत ग्रथित—चित्रित करण्याचा यथामति, यथाशक्ति प्रयत्न केला आहे.

विचारांची, भावनांची, कल्पनांची, जडणघडण नेहमींच कष्टमय पण रहस्यप्रचुर असते. अशा रहस्याला भावात्मक विभूति अर्पण करून तिचें चित्र उठविणें कठिण असतें.

## शास्त्रसिद्धान्तांनीं काव्याची श्रीमंती वाढेल

अतिव्याप्ति, अतिशयोक्ति, अतिरंजितपणा, हे प्रमाद खरे, परंतु काव्यप्रतिभेच्या मंदिरांत ते योग्य ठिकाणीं, योग्य मार्पेत प्रगट झाले असतां सद्गुण होऊन शोभून दिसतात, त्यांची मौलिकता वाढते, योग्य बूज राखली जाते. सत्य हें त्रिकालाबाधित सत्य खरें, परंतु असद्भुरमणीयतेच्या प्रांगणांत त्यानें असत्याशीं संयोग साधला असतां, त्याला अभिनव सौंदर्य प्राप्त होतें. तीच स्थिति ज्ञानाची. ज्ञानाचा ' अनुभवीं अनुभवतां नये ' असा अनुभव घ्यावयाचा असतो; परंतु हा अनुभवहि भावाधीन असतो. आमच्या काव्यप्रतिभेनें अध्यात्मविद्या आत्मसात् केली, परंतु आतां अध्यात्मविद्याच विज्ञानशास्त्रांच्या प्रयोगशाळेंत आपलें स्वतःचें पृथक्करण व परीक्षण करून घेण्यांत गुंतली असून, तेथें प्रस्थापित झालेले सिद्धान्त तिला मान्य करावे लागत आहेत. आतां पुनर्जन्म, पुनरुत्थान, पारलौकिक कल्याण वगैरे कल्पना भाबड्या ठरल्या आहेत. आतां निर्विकल्प समाधीचें अवसान कोसळून पडत आहे. आतां ' ब्रह्मसाम्राज्यदीपिके 'चा अधिकार अवकाशस्थित आकर्षण-अवकर्षणादि गतिसंघर्षसिद्ध विद्युत्सामर्थ्याच्या हातीं गेला आहे. आतां आमच्या काव्यानें विज्ञानशास्त्रांच्या प्रयोगशाळांत सिद्ध झालेले निसर्गसिद्धान्त आपल्या पोटांत पचवून, रोमरोमांत भिनवून, शहाणपणांत रावबून, रमवून, रंगवून व रसांत आत्मसात् करून घेऊन, ते आपलेपणाच्या तपशिलांनीं जगाच्या अंतरंगांत, बुद्धींत, साजेरेपणांत अनुस्यूत केले पाहिजेत व अशा प्रकारच्या नवरहस्यदृष्टीनें विचार करण्याची व आत्मानात्मविवेक गांठण्याची संवय लोकांना लावली पाहिजे. यामुळें भावप्रमुखाच्या सारणींतून वाहणाऱ्या भावानुभाववश काव्यामृताची गोडी कमी होणार नाहीं. उलट, काव्यकल्पनांच्या वैभवांत व प्रतिभास्फूर्तींत नव्या सौंदर्याच्या सद्भाववृद्धीचा, कुतूहलाचा, समावेश व विकास होऊन त्यांना अधिक उच्चाधिकार प्राप्त होतील. आम्हीं हे नवे शास्त्रसिद्धान्त काव्यापासून दूर ठेवल्यास वाङ्मयाच्या एका प्रमुख अंगाला अर्वाचीन श्रीमंतीपासून वंचित करण्याच्या पापाचे धनी होऊं. कारण, विज्ञानशास्त्र शक्यतेंत येऊं शकणाऱ्या नव्या नव्या गोष्टींच्या तोंडावरचे बुरखे दूर करतें, प्रयोगशक्य तर्कांच्या घडणींतील अंतर्गत सौंदर्य अनुभवास आणतें, सर्व वस्तूंना नव्या प्रणालींत बसवून त्यांना नव्या शिस्तीचें नवें मोल चढवितें व नव्या सुखांच्या नव्या मार्गांची आंखणी-मागणी उत्पन्न करतें.

विज्ञानशास्त्रांच्या कर्तबगारीसंबंधानें वरील सारें विवेचन ठीक असलें व कालनिसर्गासवें 'रावणाऱ्या' अथवा त्याच्यावर मात करूं पाहाणाऱ्या विवेकी माणसाला कार्य कोणतें, अकार्य कोणतें, त्यांची व्यवस्थिति म्हणजे काय व अशा स्थितींत त्यानें प्रसंगानुरूप शास्त्रप्रामाण्याप्रमाणें कसें वागावयाचें याची समंजस जाणीव असली, तरी त्याच्या सुसंस्कृत माणुसकीच्या आत्मस्थितिभावाचें खरें समाधान कशांत असतें, या प्रश्नाचा उलगडा करीत असतां, मनुष्यानें आपल्या व्यक्तिनिष्ठ जीवाला आत्मतत्त्वाच्या जडसमाधीची आराधना करावयाला लावावी, कीं त्यानें नुसतें आत्मानंदांत नित्यमग्न व सदातृप्त असावें, कीं निसर्गांतल्या जिवंत संस्कृतीशीं तादात्म्य पावण्यांत ब्रह्मानंदाची प्राप्ति होते कीं नाहीं हें पाहण्यांत अथवा त्याचा अपरोक्ष अनुभव घेण्यांत गर्क असावें, अशीं कोडीं जन्मास येतात. कारण, मनुष्य आत्मानंदांत किंवा ब्रह्मानंदांत निमग्न असला म्हणजे त्याची एका प्रकारची बेशुद्धीची अवस्था होत असल्यामुळें, तो निसर्गाच्या शिस्तींत कोठेंहि चपखलपणें बसत नाहीं. तुकारामानें ' ब्रह्मभूत काया होतसे कीर्तनीं ', ' पूर आला आनंदाचा लाटा उसळती प्रेमाच्या ', ' अणुरेणुयां थोकडा तुका आकाशाएवढा ', ' गोडपणें जैसा गूळ तैसा देव झाला सकळ '








असा आपला अनुभव सांगितला आहे. भगवद्गीतेंत ' सर्वभूतहितत्व ', ' विश्वात्मैक्य ' वगैरे कल्पनांना स्पर्श करून स्थितप्रज्ञ मनुष्याचीं लक्षणें सांगितलीं आहेत. तुकारामाचे उद्गार आणि भगवद्गीतेंतील लक्षणें यांचा पुष्कळ ऊहापोह झालेला असल्यानें येथें त्यांचा विचार न करतां, एका अर्वाचीन विद्वानाला या बाबतींत काय म्हणावयाचें आहे तें पाहूं :

" ... the humanist, however scientific, can still have a religious attitude to life......He can have ideals which he feels to be of transcendent importance, and aims which he pursues with a truly religious fervour; and he must have his equivalent of theological creeds and dogmas—an intellectual framework to support his beliefs and his personality. He is sure that some things are of value in and for themselves—human decency and human dignity, experiences of beauty and of love, inner peace and reconcilement, true knowledge and noble expression. " ( Dr. Julian Huxley, from his broadcast address on ' Humanism ', 1944 ).

माणुसकीच्या आधारावर उभ्या असलेल्या, पण धर्माकडे कल असलेल्या शास्त्राभ्यासी व परोपकाररत मनुष्यानें पारलौकिक कल्याणाच्या भोबद्ल्यांत कशाची अपेक्षा करावी, यासंबंधीं हे विचार आहेत.

परंतु पारलौकिक कल्याण अजिबात खोटें मानणारा खरा कवि मात्र ल्युक्रेशिअसच होऊन गेला. मेल्यानंतर जीव नष्ट होतो असें तो मानीत असे. लॉर्ड मोर्ले म्हणतात कीं, मिल्टनसंबंधीं चिकित्सक टीकाकारांचा एक असा आक्षेप आहे कीं, त्यानें आपल्या काव्यांत 'जीविताच्या योजनां'वर भर दिला आहे, त्यानें प्रत्यक्ष जीवनाचें चित्र रंगविलें नाहीं. तसें ल्युक्रेशिअसेंच नाहीं. तो ईश्वरवादी होता. परंतु त्यानें आपल्या ' The nature of things ' ( ' वस्तुस्वभाव ' अथवा ' प्रकृतिधर्म ' ) या काव्यांत सृष्टिजीवनाच्या विभूतीची श्रीमंती अद्वितीय रीतीनें सुप्रकाशित केली आहे. देवांबद्दल त्यानें तुच्छता दर्शविली असली, तरी अणुपरमाणू, जनन-मरण वगैरे नित्यांच्या गोष्टींबद्दल त्याचें वर्णन कळकळीचें व अर्थपूर्ण आहे. त्याच्या काव्याचा कांहीं भाग तेजस्विता, सहानुभूतिपूर्ण उच्चतम भावना, हृदयविदारक मार्दव या सद्गुणांनीं युक्त असून भव्य, डौलदार, थाटामाटाच्या स्वरांच्या आरोहावरोहांतील संगीतसौंदर्यानें भारलेला व वैभवशाली असा आहे. आपण काव्यासंबंधीं कोणत्याहि व्याख्या खुद्द कवींकडूनच उसन्या घेतल्या, तरी त्यांना पुरून उरणारें ल्युक्रेशिअसचें हें काव्य त्याचें त्यालाच वश असलेलें व निरुपम आहे. प्रसिद्ध जर्मन कवि गटे हाहि म्हणतो कीं, ल्युक्रेशिअस हा निसर्गांतील लोकोत्तर दृश्याचें वर्णन करणारा कवि व तत्त्ववेत्ता असून त्याचें ' The nature of things ' हें काव्य जगांतील एक असामान्य कृति आहे.

### जीव म्हणजे जडाची तात्पुरती अजड उपाधि

परंतु वस्तूंच्या प्रकृतिधर्मांत व सृष्टीच्या जीवनचरित्रांत व चारित्र्यांत जीवाच्या तत्त्वसत्त्वस्वरूपाचा स्वतंत्र विचार करावा लागतो. पण अर्वाचीन विज्ञानशास्त्रांच्या प्रगतीचा विचार केला असतां ल्युक्रेशिअसच्या काव्यांत जीवोत्पत्तीचें गूढ शोधणें शक्य होणार नाहीं. त्यानें अणुपरमाणू वगैरेंच्या निसर्गसिद्ध जडोत्पत्तीवर अत्यंत सुंदर काव्य केलें यांतच त्याचें थोरपण! युरोप-अमेरिकेमधील कांहीं विचारवंत, जीवाला मूलतत्त्व किंवा मूलद्रव्य, अनपेक्षित घडलेली घटना, विलक्षण गोष्ट किंवा आविर्भाव ( Primary element, Accident, Adventure, Expression) समजतात. अलीकडील त्याची व्याख्या ' सेंद्रिय जडद्रव्य व्यापणारें तत्त्व ' अशी केली जाते. एका चिनी सज्जनानें तर ' चाकाला गति देणाऱ्या त्याच्या बुधल्याचें भोंक' अशी जीवाची व्याख्या केली आहे. त्याच्या म्हणण्याचा अर्थ बुधल्यांतील मध्यवर्ती भोंकानें जशी चाकाला गति मिळते तशी सृष्टिचक्राला

अनुक्रमणिका

त्याच्या केंद्राच्या ठिकाणीं असलेल्या जीवानें गति मिळते असा आहे. आमच्या शास्त्रांत जीवाला प्राण, आत्मन् म्हटलें आहे. आद्य शंकराचार्यांनीं जीवाला ब्रह्म म्हटलें आहे. ब्रह्माला सत्य (म्हणजे नित्य, शुद्ध, बुद्ध, स्वतंत्र, जन्ममरणरहित, आद्य, अनंत, अस्पर्शक्षम) म्हटलें आहे व जगाला मिथ्या (म्हणजे भासमय, भ्रांतिमय, बदलत राहणारें) म्हटलें आहे. परंतु अर्वाचीन जीवशास्त्र व इतर विज्ञानशास्त्रें यांच्या प्रयोगनिर्मल दृष्टीनें पाहिलें असतां असें वाटावयाला लागतें कीं, या व्याख्या अत्यंत संदिग्ध आहेत. अगदीं तंतोतंत व्याख्या करणें जरी मोठें कठिण काम असलें, तरी ती विषयवस्तूच्या अंतरांशयाला जितकी चिकटून असेल तितकी चांगली. अशा दृष्टीनें विचार केला तर 'आत्मा' म्हणजे काय? शरीर कीं जीव? त्याचा आपलेपणा कशांत आहे? 'चित्' म्हणजे काय? विचार (ज्ञान), कीं अनिश्चित अर्थभावना? आनंदाला स्वतंत्र अस्तित्व असणें शक्य आहे काय? 'ॐ इति एकाक्षरं ब्रह्म' म्हणजे काय? त्या 'ॐ' मध्यें प्रकाशाचा, नादाचा संबंध असेल तर त्यांचें मूळ कशांत शोधावयाचें? असे प्रश्न उत्पन्न होतात. अलीकडील शोधांप्रमाणें प्रकाश व उष्णता हा विद्युल्लहरींचा व नाद हा वायुलहरींचा गुण आहे आणि या दोहोंची अशा रीतीनें वाट लागल्यावर ॐ मध्यें बाकी काय उरतें? त्याच्या अक्षराचा आकार? पण तो दोन डोळे व त्यांच्या मधल्या नाकाच्या कमानीच्या कल्पनेवर व नाकानें होणाऱ्या श्वासोच्छ्वासामधल्या प्राणवायूच्या साहाय्यानें प्रज्वलित होणाऱ्या अंतःस्थ, दिव्य प्रकाशाच्या रूपावर आधारलेला आहे.

मुक्ति म्हणजे काय? ती कोणाला मिळते? ज्ञानेश्वरांनीं 'अमृतानुभवां'त सूचित केलेल्या अनिर्वचनीय अवस्थेला मुक्तीची स्थिति एक प्रकारें म्हणतां येईल व जीवाला ती प्राप्त करून घेतां येते. नाथांनीं तिचें 'दो तोंडाची हरिणी आली—आणि तोंडावांचून पाणी प्याली' असें आलंकारिक वर्णन केलें आहे. जीवाच्या जाणीव व नेणीव या दोन्ही अवस्था सुटून तो आत्मसुखांत—परमात्मसुखांत गर्क होतो, जीवाला आपली गमावलेली आत्मस्थिति अथवा नित्यमुक्तावस्था मिळते.

जीवाच्या स्वरूपासंबंधीं बोलावयाचें तर साधारणतः असें म्हणतां येईल कीं, तो प्राण्यांच्या व वनस्पतींच्या शरीराच्या अभिव्याप्तीशीं समायुक्त असूं शकतो. त्याच्या उत्पत्तिगुणासंबंधीं पाहिलें असतां असें वाटतें कीं, जीव ही जड वस्तूंच्या गतींच्या संघर्षांत उत्पन्न होणाऱ्या कांहीं मूलद्रव्यांतील देशकालपरिस्थितिपरत्वें आपोआप उद्भूत होणाऱ्या उत्क्रांतिमय जाणिवेची ऊर्फ ज्ञानाची विभूति (spirit) आहे. ती ह्या अनंतांतल्या पोकळीमध्यें चलनवलनस्थितींत असलेल्या विद्युत्-शक्तियुक्त मूळ जड, निर्जीव वस्तूंमध्यें (हायड्रोजन + प्राणवायु = पाणी याप्रमाणें) नव्यानें निर्माण होणारी, पूर्वी अस्तित्वांत नसलेल्या नव्या गुणांनीं नटलेली विश्वांतील वस्तुजातांचें आकर्षण करणारी, ते संबंध प्रस्तुत करणारी अथवा आपल्यामध्यें केंद्रित करणारी, पण शेवटीं नष्ट होणारी घटना आहे. ती प्रत्यक्ष जळत नसेल, सुकत नसेल, भिजत नसेल, तोडली जात नसेल परंतु ती शरीराबरोबर नष्ट होणारी मर्त्य स्थिति आहे. ती शरीरांतलें उद्दीपन आहे: म्हणजेच ती जडाची एक तात्पुरती अजड उपाधि आहे. पण ती जडाशिवाय असूंच शकत नाहीं. (जड तिच्याशिवाय असूं शकतें.) ती स्वतंत्र, निरालंब, अजर, अमर वस्तु नव्हे. तिला जन्म आहे, मरण आहे. ती नित्य नाहीं आणि तिला मेंदूच्या द्वारें मन, बुद्धिप्रभृति सिद्धी प्राप्त होत असल्या, तरी ती विश्वव्यापी नाहीं. तिची शुद्धता व बुद्धता सापेक्ष असते. जीवाचा विकास विवक्षित पद्धतीनें विवक्षित मर्यादेपर्यंत उत्क्रांतीनें होतो.

कवि गटे हा शास्त्रज्ञ होता. फूल हें पानांचें उन्नत स्वरूप आहे, असें त्यानेंच पहिल्यानें सांगितलें. तो म्हणतो: 'Dauer im Wechsel' = Persistence in change = 'बदलांतहि टिकून राहाणारा म्हणजे निसर्ग'. पण हें निसर्गाच्या जीवनवृत्तीचें लक्षण झालें. खुद्द निसर्गाचें नाहीं. कारण, येथें 'निसर्ग' म्हणजे काय याचा प्रत्यक्ष बोध होत नाहीं. प्रो. बेन म्हणतात: 'निसर्गाला मर्यादा नाहीं, मोजकें मोजमाप नाहीं, त्यांत कशाची मुद्दाम चालविलेली जोपासना नाहीं,







मितव्यय नाहीं, नफा नाहीं, तोटा नाहीं आणि म्हणून त्यांत आनंद, पश्चात्तापहि नाहीं. निसर्गांत नाटक नाहीं, मुद्दाम केलेली व्यवस्था नाहीं, मननाकरितां अंगीकारलेल्या आसनमुद्रा नाहींत किंवा सहजमोहकता निर्माण करणाऱ्या त्याच्या स्थितींत कृत्रिमता नाहीं.' इंग्रजी शब्दकोशांत ' Nature 'ची मुख्य व्याख्या खालीलप्रमाणें आहे : ' The sum of forces and agencies at work in the physical, external world, sum of physical processes, of causes and effects which underlie and produce all existing phenomena.' या व्याख्येचा सारांश ' सहजक्रमांकित, मूलजड, अचेतन सारभूत वस्तु ' अथवा एका शब्दांत बोलावयाचें तर ' प्रकृति ' असा काढतां येईल.

प्रकृति म्हणजे निसर्ग आणि निसर्ग म्हणजे प्रकृति. परंतु ही सांख्यांच्या प्रकृतीहून थोडी निराळ्या प्रकारची आहे. ही अद्वितीय असली तरी द्विविधमूलमय आहे. सांख्यांच्या प्रकृतींत शून्य अथवा पोकळी नाहीं; हिच्यांत आहे. हिचीं, पोकळी व पोकळीप्रमाणेंच अदृश्य जड शक्ति अशीं दोन अंगें आहेत. हीं दोन्ही अंगें अजर, अमर, आद्य, अनंत व दोन्ही मिळून अनंत प्रदेश आकाश-अवकाश व्यापणारीं आहेत. हीं कधीं वेगळीं वेगळीं असतात, तर कधीं दूधपाण्याप्रमाणें मिसळलेलीं असतात. या प्रकृतीच्या जोडीला कोणी पुरुष-अध्यक्ष–माया–सजीवता नसते. ही आपणहोऊन हालचाल करीत नाहीं, परंतु हिच्यांतल्या पोकळीमुळें हिच्यांत उत्पन्न होणाऱ्या अनंत गुणांना, त्यांना लागेल तितकी जागा सांपडते. हिच्यांत नुसतीच पोकळी अथवा नुसतीच शक्ति असती, तर कांहींहि निर्माण होऊं शकलें नसतें. तिच्यांत उत्कटता ऊर्मि, स्फूर्ति, क्रांति, उत्क्रांति उत्पन्न होणें अशक्य झालें असतें. पण पोकळीचा अथवा शून्यमयतेचा गुण अविरोध हा आहे आणि शक्ति आपल्या जडत्वामुळें पोकळींत सदोदित संचार करीत असल्यानें निसर्गांत म्हणजे प्रकृतींत निरनिराळ्या ठिकाणीं गति उत्पन्न होते आणि ह्या गतीमुळें शक्तीला चालना मिळून तिच्यांतल्या मूलद्रव्यांत अथवा जड निर्जीव वस्तूंत लाटा जन्मास येतात. या लाटांचे समूह एकमेकांवर आपटतात. विद्युल्लहरी, विद्युद्बिंदू उत्पन्न होऊन त्यांचे अणु, परमाणु, प्रकाश, उष्णता, निरनिराळीं द्रव्यें व त्यांचे आकर्षण-अवकर्षण, अवस्यंदन, मंथन, चुंबन इत्यादि गुणसंबंध, आकारसंबंध निर्माण होऊन ही सर्व सृष्टि, हें विश्व-ब्रह्मांड उत्पन्न होतें. त्यांतच आपल्या ह्या पृथ्वीवरच्या सारखी स्थिति निर्माण झाली, तर ऑक्सिजन, हायड्रोजन, नैट्रोजन, कार्बन वगैरे पदार्थांच्या संघर्षांत अनेक निर्जीव जिनसांच्या जोडीनें निरनिराळे जीव उत्पन्न होतात.

वर आपण निसर्गाचें निदान केलें. त्याचे श्लेष-विश्लेष पाहिले. भाग्यक्रम पाहिले. या भाग्यक्रमांमध्यें पोकळीचे व शक्तीचे अगणित प्रकार होतात, सांडतात, मूलरूपांत अंतर्धान पावतात. निसर्ग अनंत असीम असला, तरी त्यांतली शून्य पोकळी आणि शक्ति यांच्या संयोगामुळें अवकाशाचे भागविभाग पडत असतात. दोन किंवा अधिक पदार्थांमधल्या अवकाशाला जो अवसर, क्षण, विश्रांति अथवा विलंबरूपी आयुष्य लाभतें त्याला 'काल' अशी गणिती संज्ञा आहे. या अवसरांतच पदार्थांचे संबंध, अपेक्षा अविरोधानें मावतात, नांदतात. यांच्यांतूनच किरणमाला प्रवास करतात व पदार्थांवर आपटतात आणि त्यांच्यांत घुसतात. हा सर्व कारभार निर्जीव असतो. या सर्व घोटाळ्यांना व त्यांच्यांतच उत्पन्न होणाऱ्या परिणामांना संख्या प्राप्त होतात. मनुष्य आपल्या बुद्धीनें त्यांचें गणनाशास्त्र उभवितो, पूर्वशक्तीचे परिणाम जमेस धरतो, वर्तमान तोलतो, मोजतो, भविष्यांतील अजमावतो त्यांचे ठोकताळे बनवतो, क्षराक्षरयोग निर्माण करतो व सुधारणा सुचवितो.

**निसर्गाच्या रहस्यसंपदेचा भावात्मक विकास**

मनुष्य हें सर्व करतो. परंतु त्याचा जीव, निर्गुण, निराकार, नास्तित्वाला आपल्या जड शक्तींत गुंडाळून घेणाऱ्या निसर्गांतच जन्म पावत असल्यामुळें त्या जीवाच्या नैसर्गिक व उत्क्रांतिकुशल शहाणपणाकडे वळलें असतां असें दिसतें कीं, तो अन्नसेवनादि वृत्तींनीं विकासक्षम होत असला, तरी स्वभावतः तो आपल्या स्वतःच्या रूप-संपत्तीकडे व सौंदर्यसंपन्नतेकडे आकृष्ट केला जात

असतो आणि निसर्गातील विद्युन्मय ध्वनि त्याच्याशी सदोदित एकरूप होऊं पाहतो. या व्यवहारांत घडून येणाऱ्या घटनांत विलक्षण विशाल व विलक्षण गहन काव्य निर्माण होत असतें. तें कधीं, 'वृक्षवल्ली आम्हां सोयरीं वनचरें, पक्षीही सुस्वरें आळवीती' अशा सुंदर साधेपणांत, तर कधीं 'कोणाही जीवाचा न घडो मत्सर वर्म सर्वेश्वरपूजनाचें' अशा रसाळ, गंभीर, रहस्यमय उद्गारांत बाहेर पडतें. तें कधीं 'जातीच्या सुंदरांना कांहींहि शोभतें असा लडिवाळपणाचा लळा लावतें; कधीं 'शोभिवंत भीवरातीर गंभीर नीर वाहतें' अशी रसनेवर गोड गिरकी घेतें, चाळा लावतें; कधीं 'निळ्या सारणींतून वाहतें मोत्याचें पाणी' अशी गौरवपरिणत शैली उत्पन्न करतें.

काव्याला 'रसात्मकं वाक्यम्' म्हणा, कीं 'विभ्रमशील अनुरंजनाची प्रसादाचिह्नांकित अक्षर प्रतिभा' म्हणा; तुम्हांला पटेल कीं, प्रकृतिधर्माच्या रहस्यांतील संपन्नतेचा भावात्मक विकास रसिकांच्या निदर्शनास आणणें हें कवीचें कर्तव्यच असतें. कवीला असा विकास योग्य रूपांत युक्त रंगांनीं स्थानबद्ध करून ठेवावा लागतो. शेक्स्पिअर म्हणतो :

The poet's eye in a fine frenzy rolling,
Doth glance from heaven to earth, from earth to heaven,
And as imagination bodies forth
The forms of things unknown, the poet's pen
Turns them to shapes, and gives to airy nothing
A local habitation and a name.

प्रासादिक, प्रतिभासंपन्न, रससिद्ध कवि शब्दसृष्टीचे ईश्वर असतात. अभ्यासाचे कष्ट करून सरस्वतीच्या या प्रांतांत पाऊल टाकणाऱ्या कवीला निसर्गांतील काव्य, मननाच्या आरोग्यदायक माधुर्यांत गोळा करावें लागतें. कारण, त्याला त्यांतील विभूति सहानुभूतिपूर्ण कल्पनावैभवानें सजवून प्रतिभासौंदर्याच्या द्वारें रसिकांस सादर करावयाची असते. याकरितां त्याला विषयांतला आशय विशद करून सांगण्याला लागणारें प्रसंगावधानी पण दूरदर्शी कौशल्य अजमावावें लागतें. आत्मप्रत्ययाच्या क्षोभाचा, खोलीचा, विश्वासाचा ठाव घ्यावा लागतो. ज्ञानविज्ञानशास्त्रांतील अनुमानपद्धति व धर्मशास्त्रांतील प्रत्यक्षानुभवपद्धति या दोहींतलें अनुत्तमत्व त्यांत प्रतिबिंबित करावें लागतें. बाह्य वस्तूंमधल्या वैशिष्ट्यांच्या निदर्शनांत आत्मभावाच्या प्राधान्यांच्या छाया गुंफून सौंदर्याची जाणीव व सत्ता स्थापित करावी लागते. कवीला असें वाटतें कीं, आपल्या काव्यांतील संवेदन-मृदु मोहनमंत्र रसिकाच्या रसनेवर व मेंदूवर लोळतघोळत राहिले पाहिजेत. त्यांनीं त्याला संजीवन दिलें पाहिजे. आणि याकरितां तो आपले शब्द व कल्पना निसून, चाळून, पाखडून, पारखून घेतो. परंतु कवीच्याहि बुद्धीवर वेळोवेळीं चढत असलेल्या पटलांमुळें निसर्गांतील मुग्ध काव्य प्रत्यक्षांत अवतरत असतां तें त्याच्या दृष्टीला सदोदित दिसत नाहीं आणि त्यामुळें निसर्गजीवनांत सहज होत जाणारा बदल त्याच्या लक्षांतून निसटून जातो.

### प्रकृतिकात्यायनीचा विलास

प्राणी जन्मास येतो त्याबरोबरच त्याचा अन्नसेवन करण्याचा धर्महि जन्मास येतो. मनुष्येतर प्राणी निसर्गांतील शिस्तीप्रमाणें स्वभावतः वागत असतो. परंतु, मनुष्याला बुद्धीच्या उन्नतावस्थेची देणगी मिळाल्यामुळें त्याला जगण्याच्या करमणुकींतच जीवनाचा आनंद भोगण्याची पात्रता आलेली आहे. त्याला अद्भुतरमणीयतेच्या करमणुकीची इच्छा होणें किती स्वाभाविक आहे! करमणूक म्हणजे पाप नव्हे; वरप्रसाद आहे; धर्म आहे. खरी करमणूक पावित्र्यांतून, दिव्यत्वांतून उत्स्फूर्त होते. पवित्रतेचे, दिव्यत्वाचे थोर प्रेमोद्गार व माणुसकीचें थोर हृदयवैभव यांचा मेळ जमविणारी ही अद्भुत करमणूक ब्रह्मांडांतील विद्युद्धृतीवर व तिच्या अतर्क्य संबंधांवर अन्वयार्थ चढविते व सृष्टिसौंदर्याच्या सात्त्विक श्वासोच्छ्वासांत उमटून निघते. ती जशी रेडिओॲक्टिव्हिटीचे विजयस्तंभ उभारते, तशीच ती फुलांफुलांतून फुलपांखरांचे फवारे उडविते. ती जशी पक्ष्यांच्या कंठमाधुर्यांतून शुइफुगडी घालीत सुंदर आलाप घेते, तशीच ती रसिकाच्या मेंदूंत विश्वांतले वीणानाद जागृत करून त्याची ध्वनिसमाधि लावते.










ती जशी एखाद्या व्यासाला विश्वरूपाच्या कल्पनेची स्फूर्ति अर्पण करते, तशीच ती चंद्रसूर्यादि नक्षत्रांच्या किरणवीचींतल्या रंगसंगतींची पांगापांग व त्यांचें पुनःकेंद्रीभवन यांच्यांत, इतस्ततः धावणाऱ्या ग्रह-मालांच्या संघर्षांत अथवा विद्युत्तरंगबिंदूंत गरबा नृत्य करीत असतां, एखाद्या आइन्स्टाइन्ला कालगुणाच्या परिमाणप्रामाण्यानें पोकळीचे आराखडे जुळविण्याचा कानमंत्र देते.

भगवंतांनीं अर्जुनाला कोणते दिव्यचक्षू दिले होते, तें माहीत नाहीं. श्रीमद्व्यासांनींहि याचा कुठें खुलासा केला नाहीं. पण आतां शास्त्रज्ञांनीं आपले शोध तत्त्वज्ञांच्या स्वाधीन करून, त्यांना जीविताच्या गूढ सौंदर्याला होकार भरणाऱ्या निसर्गांतील चांगुलपणाच्या पारदर्शक रूपरेखा काढण्याच्या नादीं लावलें आहे. शास्त्रज्ञांनीं आम्हांला आगगाड्या, आगबोटी, मोटारगाड्या, विमानें वगैरे सिद्धी पुरविल्या आहेत. त्यांच्या संशोधनकर्मीनीं धर्मशास्त्रें निर्माण केलीं आहेत. त्यांनीं आतां आम्हांला दुर्बिणी, सूक्ष्मदर्शक यंत्रें वगैरे दिव्य चक्षू दिले आहेत; रेडिओ, बिनतारी तंतुयंत्रें, किरणक्षोभक करंडक, उत्साहजनक पिंड, ध्वनिकर्षक, ध्वनिक्षेपक तबकड्या वगैरे स्पर्शग्राही, स्पर्शोत्क्षोभी ज्ञानेंद्रियें पुरविलीं आहेत. प्राणिमात्रांच्या शरीरांच्या बाहेर राहणाऱ्या या नव्या व आश्चर्यकारक निर्जीव ज्ञानेंद्रियांच्या गूढ प्रयोगांनीं आंतरप्रतीतीच्या तपशिलांचीं अंगोपांगें वाढलीं आहेत, जीवांच्या जाणिवांचीं पटांगणें विस्तार पावलीं आहेत; नवे धर्म जन्मास आले आहेत; नवे श्रुतिरव ऐकूं येत आहेत; विश्वरूप नव्या योगैश्वर्यांनीं नटलें आहे, नटत आहे; आत्मानंदाचें रहस्य जास्त शुद्ध झालें आहे; ब्रह्मानंदाला नवे रंग, नवे पंख फुटले आहेत; मस्तिष्क नव्या पदार्थांचें, नव्या प्रमेयांचें, नव्या प्रदर्शनांचें मंथन करीत आहे! या मंथनांत कोणतीं नवीं रत्नें निघावयाचीं असतील तीं निघोत. पण, आतां तर्कांना भावनाकांक्षांच्या वराती नुसत्या वाऱ्यावर काढण्याचें प्रयोजन उरलें नाहीं. आतां प्रकृति-कात्यायनी प्रसन्न झाली आहे व अभीष्ट वरप्रदानानें प्राणिमात्राला कृतार्थ करीत आहे. कल्पनांनीं मूर्त रूपें धारण केलीं आहेत. आणि जरी यांत्रिक मेंदू तयार होत आहेत, यांत्रिक हृदयें तयार होत आहेत, यांत्रिक मंत्र प्रसरण पावत आहेत, काव्यालंकाराबरोबर गणिती हिशेब स्पर्धा करीत आहेत, तरीहि कूटस्थाच्या घटकांचा पोटउकला होत असल्यामुळें सर्व प्रकारच्या अर्वाचीन दृक्प्रत्ययांचा व त्यांच्या प्रतिबिंबांचा आपल्या अपराविद्येंत व नीतिरहस्यांत समावेश करून घेणारी अथांग महाभगवद्गीता जन्मास येत आहे.

## सृष्टिसौंदर्याची अनुभूति

मनुष्यव्यक्तीला बुद्धिप्राधान्याबरोबरच भावनाप्राधान्य, कल्पनाप्राधान्य प्राप्त होत असतें व तें आपली भरपाई आपणच करतें. त्याला ' आत्मा वा अरे द्रष्टव्यः श्रोतव्यः मंतव्यः निदिध्यासितव्यः 'चें स्वयंशिक्षणहि मिळतें. याचा एक स्वतःचा कथाप्रसंग सांगून हें लांबलेलें स्पष्टीकरण संपवूं.

आमच्या या विदर्भप्रांतांत साधारणतः श्रावणाच्या महिन्यापासून पुढें व विशेषतः दसऱ्या-दिवाळीच्या दिवसांत निरंजननिरागस सृष्टिसौंदर्याला पूर चढलेला असतो. चंद्रसूर्यांचे प्रकाश धुतल्या तांदळाप्रमाणें स्वच्छ झालेले असतात. विश्वाचें विशाल दालन खुलें झालेलें असतें. निरभ्र, निर्मळ, निळ्याजांभळ्या आभाळांतील अपरंपार लावण्य लवलव करीत असतें व त्यांतल्या अमृतश्रीचें अथांग गांभीर्य ' कशी बोटानें दाखवूं तुला ' अशा आपल्या मायेची पाखर सृष्टीच्या कायेवर पाडून, निर्झरांच्या हास्याच्या पार्श्वभूमीवर, तिच्या हरित तारुण्याची निर्भय रमणीयता द्विगुणित करीत असते. अशा या विलाससुंदर दिवसांत मी प्रत्येक प्रातःकालीं सृष्टि-सौंदर्याच्या लहरींत आपल्या कल्पनासौंदर्याच्या लहरी गुंफीत गुंफीत आपल्या शेतांवर जात असें. तेथें मला कृषिकौशल्यामधून उचंबळून आलेल्या लावण्याचें दर्शन होई. जीवाला जिवंत भावना व मनाला जातिवंत उल्हास मिळवून देणारा ताजेपणा कसा असतो तें समजून येई. लसलसणाऱ्या वनस्पती आत्मतृप्तीच्या आमोदांत झुलत असतांना दिसत. माणिकमोत्यांनीं नटलेल्या पिकांवर मनोहर रंगांचे कल्लोळ वायूच्या झुळकीबरोबर लडिवाळपणानें गोड दंगामस्ती करीत असतांना दिसत. कांतिमान् झावळि-यांचा ललित विभ्रम उत्पन्न होई. नंदनवनांत










शिरल्यासारखें वाटे. भावनाविवश मनाच्या स्थितींत मी तेथल्या एखाद्या अप्सरेच्या ओठावरल्या अमृतबिंदूचें अत्यंत प्रेमभरानें चुंबन घेई. तेथल्या एखाद्या इक्षुदंडाला चवळीच्या कोमल लतिकेचा विळखा पडलेला दिसे. जेजुरीच्या मल्हारिमार्तंडासारखीं तुरीचीं झाडें अखंड भंडारांनीं डवरलेलीं दिसत. कापसाचें झाड मला आपलें उमललेलें चकांगसुंदर सुकुमार पुष्प दाखवून कानगुजूं लागे कीं, स्वर्गाचा शोभिवंत दरवाजा तो हाच. वाणीचीं कणसें आपला क्षुधाप्रवर्तक सुगंध उधळून आदबीनें आग्रह करीत कीं 'प्रकाशकिरणांपासून अन्न तयार करण्याचे हे आमचे अद्‌भुत कारखाने पाहा.' इतक्यांत खालून शेतांतील मऊ मऊ माती पायांना गोड गुदगुल्या करी व वरून एखाद्या सारिकेची गानलकेरी मंगल अभिषेक करी. तेथल्या अन्नकूटमहोत्सवाकरितां जमलेलें पक्षिकुल आपल्या कूजितांतून मला संदेश पाठवी कीं, 'तूं ह्या चैतन्यप्रपूरित प्रपंचाच्या समारंभांत व हितसंवर्धक महोत्सवांत अंतःकरणपूर्वक भाग घे आणि तत्त्वसौंदर्यभूषित मनोराज्यांत गर्क हो. येथें तुला सृष्टीचा विनोद समजेल. शांतीचें ओझें वाटणार नाहीं. आनंदाचें अजीर्ण होणार नाहीं. तुझें जीवन नीरस, निराशाग्रस्त, कंटाळवाणें, विवेकशून्य होणार नाहीं. इतकेंच नाहीं तर उलट तें मोदप्रफुल्लित, प्रतिभाभूषित, संपन्न होईल.' मला 'आश्चर्यवत्पश्यति' होई! पाहूं तरी काय काय? ऐकूं तरी काय? विचार तरी कशाचा करूं? कल्पना तरी कशाकशाची करूं, असें होई! सहस्र विद्युद्दीपांची मर्ममधुर रोषनाई एकदम प्रदीप्त होई! हें सर्व विश्व प्रेमाच्या व सौहार्दाच्या समृद्ध व सुस्वर ध्वनींनीं व सुस्वप्नांनीं भारल्यासारखें वाटे. मला कुणी तरी थोर पदावर विराजमान करी. मंगलाष्टकें ऐकूं येत. आणि मी 'गगनाचेनि पालवें गाळून' घेतलेल्या गोपालकाल्याची गोजिरवाणी अभिरुचि अष्टांगांनीं सेवन करीं. अशा या भावनामय पवित्र अनुभूतीच्या स्थितींत कांहीं काल गेल्यानंतर मन ठिकाणावर येई व आपल्या स्वतःलाच उपदेश करूं लागे कीं, कुचराई न करतां योग्यतेप्रमाणें लहानमोठें कर्तव्य करावें, उच्च विचारसरणीचा आनंद भोगावा; पण चित्त शुद्ध व राहाणी साधी, स्वच्छ, व्यवस्थित ठेवावी, कोणाचाहि मत्सर करूं नये, कोणाशींहि कपटानें वागूं नये; 'यत्न तो देव जाणावा'.

'गरजा ठेवी साध्यासोप्या अल्पमोल हितकरा।
अवश्यक इष्ट गुणें सुखकरा।
सुगेहिनीसम निसर्गरुचिरा संसारीं सुंदरा॥'

---

# हें माझें अग्निगीत

भडकें हृत्स्थंडिलांत ॥
हें माझें अग्निगीत ॥
एक शब्द, एक ओळ,
क्रुद्ध, क्षुब्ध, तप्त, लोळ,
चूरचूर विश्वगोल,
निज भीषण तांडवांत ॥ १ ॥
फुललेल्या डोळ्यांतुन,
आवळल्या ओठांतुन,
फांसांतिल नरड्यांतुन,
भिरभिरतें त्रिभुवनांत ॥ २ ॥
येथ भावना ज्वलन्त,
हांसतात बंधमुक्त,
प्रलयाच्या कौतुकांत,
दुबळ्यांची खाक प्रीत ॥ ३ ॥
स्वैर ऐकतां लकेर,
"धुंद" कांपती थरार,
डगमगतो धरणीधर,
हादरतो लोकनाथ ॥ ४ ॥
निढळाच्या घामांतुन,
धगधगत्या श्वासांतुन,
त्वेषांतील अश्रूंतुन,
जाई जें ओसंडत
हें माझें अग्निगीत ॥ ५ ॥

—सुरेश भट







प्रा. शं. गो. तुळपुळे

# यादवकालीन महाराष्ट्राचें महानुभावीय दर्शन : २ :

[ शके १२०० च्या आगेमागें रचिलें गेलेलें 'लीळाचरित्र' आणि 'गोविंदप्रभुचरित्र' हे जे दोन महानुभावीय ग्रंथ त्यांमधून यादवकालीन महाराष्ट्रीय समाजाच्या विविध अंगांचें दर्शन घडून त्या समाजाच्या स्थितिगतीची कांहीं कल्पना करतां येते. प्रस्तुत लेखमालेंतून लेखकानें या दोन महानुभावीय ग्रंथांच्या आधारें यादवकालीन महाराष्ट्राची सामाजिक पहाणी करण्याचा प्रयत्न केला आहे. या लेख-मालेंतील पहिला लेखांक 'नवभारता'च्या जून ( १९५१ ) च्या अंकांत आला असून त्यांत जातिभेद, विटाळ, सामाजिक सुरक्षितता, अधिकार व अधिकारी, गुन्हे व शिक्षा, शेती व शेतकरी, व्यापार व व्यापारी यांविषयीं तत्कालीन उल्लेखांचा विचार केला आहे. ]

उद्योगधंदे :

महाराष्ट्रांत यादवकालीं रूढ असणाऱ्या कांहीं उद्योगधंद्यांचीहि कल्पना प्रस्तुत चरित्रग्रंथावरून येऊं शकते. पैकीं तेल्यांचे उल्लेख अनेक असले तरी तीळ पाखडणाऱ्या 'तिळतेलिणी'चा व घाणा खेटणाऱ्या तेल्याचा उल्लेख विशेष महत्त्वाचा आहे. हा तेली स्वतःस 'तीळमारा तेली' म्हणवितो. त्यावरून तेल्यातेल्यांत भेद असावे असें दिसतें ( ए. १८ )[1]. एक पाइक्याचा 'सतांबोळी विडा' घेतल्याचा उल्लेख आढळतो त्याअर्थी तेव्हां तांबोळी असणार हें उघड आहे ( उ. २९२ ). परिटांच्या धंद्याचा पुढील उल्लेख मनोरंजक वाटेल. चांगदेव भटानें 'आपणांस चक्रधरांच्या दर्शनास घेऊन केव्हां नेणार ?' असा प्रश्न केल्यावरून जानो उपाध्ये त्यास पुढीलप्रमाणें उत्तर देतो– "पाहेचा दीसु राहे : माझी पासोडी धुतली येइल : मग परवां जाऊनिः" त्याप्रमाणें पासोडी धुऊन आली व तिला दोरा घालून ते निघाले ( पू. १० ). यादवकाळांतील परीट वक्तशीर दिसतात ! अन्य ठिकाणीं एका परटिणीचा साधा उल्लेख आहे ( गो. १५१ ). शिंप्यांचे उल्लेख दोनतीन ठिकाणीं आले असून त्यांपैकीं एकांत नागदेवानें चक्रधरांची एक आंगी 'प्रमाणा'-साठीं बरोबर नेऊन त्यांच्यासाठीं शिंप्याकडून नवीन आंगी शिवल्याची व शिवणावळ म्हणून एक दाम दिल्याची हकीगत आहे ( उ. १२१ ). दुसऱ्या एका लीळेंत चक्रधरांनीं आपल्या एका आंगींतून शिंप्याकरवीं सहा महिन्यांच्या वैराग्यदेवास आंगुलें, गांगाइसेस चोळी व महेश्वरपंडितास आंगी इतके कपडे शिवल्याचा उल्लेख येतो ( उ. ३०६ ). तेव्हांचे शिंपी शिवणकामाबरोबर कापडविक्रीचाहि धंदा करीत, असें त्यांच्याकडे वस्त्रांचीं 'दिंडें' म्हणजे गांठोडीं विक्रीसाठीं असत, या उल्लेखावरून वाटतें ( गो. ५२ ). प्रस्तुत गद्यकाळांत चाम्हार म्हणजे चांभार आहेत व त्यांच्याकडून वहाणा बांधवून घेण्याची प्रथाहि आहे ( उ. २१६ ). कासार म्हणजे तांबट ( गो. २७८ ) व खाती

१ संक्षेपचिह्नांचें स्पष्टीकरण : 'लीळाचरित्र' ( ए. = एकांक; पू. = पूर्वार्ध; उ. = उत्तरार्ध 'गोविंदप्रभुचरित्र' ( गो. ). अंक लीळांचे क्रमानें आहेत.







म्हणजे लोहार ( गो. ३०४ ) यांचीहि वाण नाहीं. तसेंच ' सुरें ' म्हणजे वस्तऱ्यानें क्षौर करणारे व ' नरवीं नखें फेडणारे ' वारिक आहेत, इतकेंच नव्हे तर ते चांगले 'संभावनशील'हि आहेत. त्यांचे दरहि क्षौर करण्यास एक दाम याप्रमाणें बेतांत दिसतात ( उ. ३५० ). सराफ आणि सराफीचा धंदा यांची दखल मागें घेतलीच ( गो. २४९, ३०५,३०६ ). आवा घडविणाऱ्या कुंभारास ' चोरचोळी ' देऊन त्याचीं मडकीं गोविंदप्रभूंनीं सर्वांकरवीं लुटविल्याचा वृत्तान्त अनेक दृष्टींनीं उद्बोधक वाटेल ( गो.१२४ ). प्रपंचास लागणारी ' राहाटी ' म्हणजे मडक्यांची उतरंड पुरविण्याचें काम कुंभाराकडेच असें ( गो. १२५ ). खाटकाच्या दुकानाचें वर्णन घृणाकारक असलें तरी इतिहासास त्याचें महत्त्व आहे ( गो. ४९ ). पूर्वार्धातील एका लीळेंत चाटे म्हणजे विणकर व त्यांची सूत बडविण्याची ' मोगरी ' यांचा उल्लेख आढळतो ( पू. ३४ ). प्रस्तुत चरित्रग्रंथांत जसें उद्योगधंद्यांचें तसेंच पोटापाण्यासाठीं कराव्या लागणाऱ्या किरकोळ किंवा हलक्यासलक्या कामांचेहि उल्लेख येतात. उत्तरार्धातील एका लीळेंत आलेलें मोळिकाराचें वर्णन या दृष्टीनें उद्बोधक वाटेल. पायांत वाखाची वादी लावलेल्या तुटक्या वाहाणा व पांघरलें तर फाटेल म्हणून गोळा करून काखेंत धेतलेलें कांबळ्याचें फाटकें रगटें अशा थाटांत रानांतून डोकीवर मोळ्या वाहून जे कांहीं दाम किंवा रुके येतील त्यांतून मीठमिरची आणणारा व प्रपंचाचे कष्ट उपसून शिणल्यावर ' तुटकी ऐसी बाज तयावरी फाटुकी ऐसी वाकळ ' आंथरून पडणारा हा मोळीविक्या म्हणजे त्या काळांतील श्रमिकांचा एक प्रतिनिधिच होय ( उ. ४०५ ). दुसऱ्याचीं गुरें राखणारा गुराखी हाहि एक असाच श्रमिक असून त्याच्या श्रमाचा मोबदला म्हणून त्यास ' मोट घालण्याचा ' म्हणजे त्याच्याबरोबर अन्नाची शिदोरी देण्याचा प्रघात दिसतो ( ए. ४० ). आंगी लेवून व हातीं काठी घेऊन हिंडणारा ' म्हणियारा ' म्हणजे निरोप्या किंवा हरकाम्या हाहि याच वर्गातील म्हटला पाहिजे ( उ. २५८ ). यादवकालीं अधिष्ठात्यानें म्हणजे मालकानें ' मोलकै ' म्हणजे मजूर वेठीस धरून नेण्याची व त्यांच्याकडून शेतावरील काबाडकष्ट करवून घेण्याची पद्धति रूढ असावी असें एका आठवणीवरून वाटतें ( ए. ३९ ).

## नाणीं

महाराष्ट्रांत यादवकालीं रूढ असणाऱ्या अनेक नाण्यांची माहिती प्रस्तुत चरित्रग्रंथांतून मिळते. पैकीं आसू आणि दाम या दोन नाण्यांचे उल्लेख सर्वांत अधिक असून, आसू हें सोन्याचें नाणें सर्व नाण्यांत मूल्यवान् दिसतें. आसू–दाम हीं श्रीमंतांचीं व कवडा–पोफळ हीं गरिबांचीं व्यवहाराचीं साधनें असावीं, असें एका लीळेवरून वाटतें ( उ. १६९ ). वास्तविक नाणें म्हटलें, कीं तें एकसारखें असावयास पाहिजे. परंतु आसूआसूंत अनेक प्रकार दिसतात. " हे वांकटः हे फुटक : हे तुकसठ : हे खोलट : हे बरवट : हे कुडी : हे खरी : हे सोपान " इतक्या प्रकारांचा उल्लेख स्वतः गोविंदप्रभूंनें एका ठिकाणीं केलेला आहे ( गो. ५४ ). यांत्रिक टांकसाळ नसल्यानें नाणीं एकसारखीं निघूं शकत नसावीं. असो. आसू आणि दाम यांतील कोष्टकांची कांहीं कल्पना एका लीळेवरून येउं शकते. एका कापडविक्यानें एका आसूचें वस्त्र महदाइसेस लोभाखातर सोळा दामांस दिलें व पुढें त्याची किंमत करतांना सोळा, वीस, बावीस दाम याप्रमाणें होतां होतां ' पाऊण आसूंस असें वस्त्र आणून द्याल काय ? ' असा प्रश्न चक्रधरांनीं केला. त्यावरून तीस-एक दामांची एक आसू होई असें वाटतें ( पू. २०४ ). रुका किंवा रुवा हें नाणें दामाच्या खालचें असून त्याची किंमत बरीच कमी दिसते ( पू. ११०;उ. १०७, १२१ ). रुव्याच्या खालीं अनुक्रमानें दुगाणी ( पू. ११८ ), कवडा ( उ. ९९, २९२ ) व पाइका (उ. २९२ ) हीं नाणीं येतात. गरीबगुरीब पोफळेंहि नाण्यांप्रमाणें वापरीत ( उ- १६९ ). बाजारांत सातरा पसरून भिक्षा मागितली असतां ' तार कवडा पोफळ ' इत्यादि वस्तू भीक म्हणून घातल्याचा दोनदां उल्लेख येतो त्याअर्थी तार हें तत्कालीन नाणें दिसतें ( उ. २००, २०१ ).

नाणीं म्हटलीं, कीं नाणवट आलेंच. ' नाणवट करणें ' म्हणजे नाण्यांचा व्यवहार करणें हा वाक्प्रचार तत्कालीं रूढ असून हा व्यवहार 'सोवनीपसाऱ्यांत'








म्हणजे सराफीच्या दुकानांत चाले व तेथें निरनिराळ्या नाण्यांची पारख होई ( गो. ३०५ ). नाणवट प्रत्येक गांवीं असत असें म्हाइंभटानें तळेगांव, वांठवडा व कौंडण्यपूर येथील नाणवटांवरून जोडलेल्या द्रव्याच्या वृत्तांतावरून दिसतें ( गो. १९३ ).

**क्रयमूल्यें**

नाण्यांच्या पाठोपाठ त्यांच्या क्रयमूल्याचा विचार ओघानेंच येतो. ज्ञानेश्वरींतील ' साडेपन्हेरें ' या सुवर्णार्थी शब्दावरून सोन्याचा भाव तेव्हां साडेपंधरा असावा, इत्यादि तर्क आपण करतों. सोन्याचा अशा प्रकारचा एकहि उल्लेख ' लीळाचरित्रां 'त किंवा ' गोविंदप्रभुचरित्रां '-त येत नसला, तरी इतर वस्तूंच्या किंमतीचे इतके स्पष्ट उल्लेख या दोन चरित्रग्रंथांतून येतात कीं, त्यांवरून तत्कालीन बाजारभावांची कल्पना करणें सोपें व्हावें.

प्रथम अन्नवस्त्रांच्या किंमतीचा विचार करूं. चक्रधरांचा मुक्काम बाणेश्वरीं असतां पुढील गांव लहान म्हणून बाइसेनें साधारण आठ-दहा माणसांना चारएक दिवस पुरेल इतकें वाणसामान म्हणजे ' कणिक, तांदूळ, तूप, हिंग, मिरें, जिरें व साखर ' इतक्या वस्तू आठ दामांस आणल्याचा उल्लेख आढळतो ( पू. २७ ). अन्यत्रहि आठ दामांस ' वेचु ' म्हणजे स्वयंपाकाचें सर्व साहित्य आणल्याचा उल्लेख आहे ( पू. ४० ). अन्य ठिकाणीं एका माणसासाठीं दुगाणीचें व एक दामाचें दूध आणल्याची हकीगत आढळते ( पू. ११८ ). तसेंच, चक्रधरांसाठीं तीन रुक्यांचें दूध आणल्याचाहि उल्लेख एका ठिकाणीं आढळतो ( उ. १०७ ). वहाणांस लावण्यासाठीं एक रुक्याचें लोणी पुरत असें ( उ. १२१ ), व मोहाळू नांवाच्या फळांची टोपली विकून एक दाम येई ( गो. १७२ ). गोविंदप्रभूंच्या दर्शनास म्हाइंभटानें सात दामांचा गूळ आणल्याचा उल्लेख आढळतो ( गो. ९७ ). आपली वस्तु गहाण ठेवून कर्जाऊ रकम काढण्याची पद्धति तेव्हां रूढ होती हें आपण पुढें पाहूंच. तिला अनुसरून पोफळफोडना म्हणजे अडकित्ता सोळा दामांस व ' सेताची पाटी ' दोन आसूंस गहाण ठेवल्याची माहिती मिळते ( पू.४०; उ.३५४,४६० ). आंब्यांचा उल्लेख कांहीं ठिकाणीं असला तरी त्यांचा भाव कळण्यास कांहीं मार्ग नाहीं. अकाळीं म्हणजे आंब्याचे दिवस नसतांना आंबा कोठें आढळल्यास गरजू लोक फळांमागें एक आसू देण्यास तयार होत, इतकें मात्र कळतें ( गो. २२० ). असो. अन्नाकडून वस्त्रांकडे वळल्यास ' तें वस्त्रें सवंगें होतीं ' असा एक उल्लेख मिळतो ( गो. १२२ ). गायकांचीं चांगलीं लुगडीं सात आसूंपासून एक आसूपर्यंत मिळत ( गो. १२२ ), व एका चोळीस साधारण सहा दाम पडत ( गो. १५३ ). महावस्त्राच्या किंमती सोळा दामांपासून पांच आसूंपर्यंत होत्या असें चक्रधराच्या शिष्यांनीं त्यास अर्पिलेल्या वस्त्रांवरून कळून येतें ( पू. २०४, २६९. उ. ३५४ ). आपली ' पासवडीची पाटी ' म्हणजे उत्तरीय वस्त्र म्हाइंभटानें एकदां आठ दामांस व एकदां अकरा दामांस विकल्याचे असे दोन उल्लेख आढळतात ( गो. ९७; उ. ४७१ ). एकदां चक्रधरांकडून मिळालेला 'बाहिरवास' म्हणजे अंगावरून घेण्याचें वस्त्र आउसेनें एका ब्राह्मणास दान केला व नागदेवानें त्या ब्राह्मणास एक दाम देऊन तो परत आणला. या हकीगतीवरून बाहिरवासांच्या किंमतीची कल्पना येऊं शकेल ( उ. ८१ ). द्वारावतीहून ' सोरठी जाडी ' म्हणजे काठेवाडी घोंगडी आणविणें असल्यास तिला साधारण दोन आसू पडत ( उ. १७८ ). ' कुराचा मातांग ' वर्षाकाठीं तीन वस्त्रें विणून देई व त्यास म्हाइंभट ' चौथरियासाटी आसू ' देत असा उल्लेख येतो; त्यावरून पाहतां एका वस्त्राची किंमत वीस आसू असावी असें दिसतें ( गो. २८३ ). इतर वस्तूंच्या किंमती पाहतां मोळीविक्यास मोळी विकून कधीं दाम तर कधीं रुके येत ( उ. ४०५ ), व एका पाइकेयास म्हणजे पैशास फुलांची माळ व तितक्याच किंमतीस ' सतांबोळीं विडा मिळे ( उ. २९२ ) इतकी माहिती मिळते. तसेंच एकदां लखुबाइसेनें चक्रधरांस अडीच आसूंचें महावस्त्र घेण्याचें योजिलें असतां, अर्धी आसू कमी पडूं लागली, तेव्हां तिनें आउसेची एक वाटी चवलीभार सोन्यास विकून अडीच आसू पुऱ्या केल्या. या आठवणीवरून सुवर्णमूल्याची कांहीं कल्पना येऊं










शकेल ( उ. ३५४ ). म्हाइंभटानें ' साटि आसू चौथरिया ' देऊन रिधपूरचा राजमठ खरीदल्याचा उल्लेख येतो तोहि महत्त्वाचा आहे ( गो. ११५ ). मोलमजुरीचे भाव पाहिल्यास आंगीच्या म्हणजे अंगरख्याच्या शिवणावळीचा एक दाम ( उ. १२३ ), गव्हाच्या दळणावळीचे तीन रुवे (उ. २२९), हजामतीस कांहीं कवडे (उ.३००), व न्हाव्याकडून नखें काढविण्यास एक दाम ( गो. २९४ ) याप्रमाणें दिसतात. त्र्यंबकजवळील गंगाद्वारीं म्हणजे गोदावरीच्या उगमीं असणाऱ्या नरसिंहाच्या देवळांतील बडव्याची रोजची प्राप्ती एक दाम आणि तीन रुवे होती अशी माहिती मिळते ( पू. ११० ). दूरच्या प्रवासांतील वाटखर्चाचे दोन उल्लेख असून त्यांवरून पाहतां द्वारावतीस जातांना आठ दाम ( उ. १७८ ) व वाराणशीस जातांना दोन आसू ( उ. ४६० ) वाटखर्चासाठीं म्हणून घेतल्याचें कळतें.

### बाजारहाट

यादवकाळांत व्यापारी पेठेस हाट या शब्दानें संबोधिलें जाई. बाजार हा शब्द मुसुलमानी राजवटींतील, अतएव उत्तरकालीन आहे. अर्थात् म्हाइंभटाच्या चरित्रग्रंथांतून हाटांचे उल्लेख येतात, बाजारांचे येत नाहींत. परंतु आज बाजारहाट हा द्विरुक्त जोडशब्द मराठी भाषेंत रूढ असल्यानें वर तोच योजिला आहे. यादवकाळांत अनेक प्रकारचे हाट दिसून येतात. ' रांधवणहाट ' म्हणजे हलवाईगल्ली ( ए. १३, ७ ), ' माळिहाट ' व ' गाडेहाट ' म्हणजे अनुक्रमें फुलांचा व गाड्यांचा बाजार ( गो. १४३ ), ' सोवनहाट ' म्हणजे सराफकट्टा ( गो. २४९ ), व ' सामान्यस्त्रीहाट ' म्हणजे वेश्यांची आळी इतक्यांचा उल्लेख तर स्पष्टच आहे. पैकीं रांधवणहाटांत जुगारीचा खेळ चाले असें एका लीळेवरून दिसतें ( ए. १३ ). तसेंच सोवनहाटांत जशी सोन्याची तशी नाण्यांचीहि देवघेव होई ( गो. ३०५, ३०६ ). त्या त्या गांवच्या बाजाराचा दिवस ठरलेला असे व लोक आपल्या गांवाहून शेजारच्या गांवीं बाजारहाट करण्यासाठीं जात ( ए. १२, पू. ३० ). हाटवटी म्हणजे बाजारपेठ कधीं नदीच्या वाळवंटांतहि भरे व तेथें व्यापाराबरोबर सातारा पसरून भीक मागण्याचाहि धंदा चाले ( उ. २०० ). हाटवटीची शोभा रात्रीच्या वेळीं विशेष दिसे असें पुढील वर्णनावरून वाटतें—

"वीळिचां गोंदरी भरली असेः दोहीं सुरकौनि दिवे लागले असति " ( पू. १३२ ). हाटांत जाऊन लोक ग्राहिकी म्हणजे खरेदी कशी करीत तें पुढील वर्णनावरून कळून येईल—" गोसावीं आंगीं टोपरें केलें : ग्राहिकवेखु स्वीकरिला : भटोबासाचां हातीं पुडवाटोवा : मग पव्हेया आंतु बीजें केलें : गोसावी दुसेयाचेया पसारेया बीजें केलें : करिजाति : या जी म्हणौनि : गोसावियांसि आसन घालीति : गोसावी आसनीं उपविष्ट होती : विडा वोळगविती : मग : गोसावी धारण चर्चिती : ते तेयांसि हातासन करीती : आणिकीं ठाइं ग्राहिकी करीतिः आणि गोसावी बीजें करिती : कापूर : कस्तुरी : सडक चंवर : पाटाऊः मोतियें : उचनीच : सकळैः " ( उ. १८४ ). वरील वर्णनावरून बाजारांतील गर्दी, कापडाचीं पालें, प्रतिष्ठित गिऱ्हाइकाचें होणारें आदरातिथ्य, मालाची धारण इत्यादि अनेक बाबी उजेडांत येऊन सामाजिक चालीरीतींचें सातत्य ध्यानांत येतें.

### मापें-वजनें

कोणताही व्यवहार म्हटला, कीं त्यास माप आलें. यादवकालीन समाजांत मापांचे तीनचार प्रकार रूढ दिसतात. पैकीं पहिल्यांत धान्याचीं मापें येतात. नागदेवानें एका गांवांतून दोन चौंभ चणे भिक्षा म्हणून आणल्याचा उल्लेख आहे; त्याअर्थीं चौंभ हें एक माप असावें असें वाटतें ( उ. २३६ ). तसेंच कुडवाभराचे मांडे रांधल्याचा उल्लेख येतो, त्या अर्थीं कुडव हेंहि एक मापच असणार ( उ. ३०४ ). गोविंदप्रभुचरित्रांत आलेले ' दसकी ' ' पव्हरकी ' व ' बारकी ' हे उल्लेख संख्याविषयक असून प्रस्तुत संदर्भात ते त्या त्या मापाच्या पोत्यांचे दिसतात ( गो. १६० ). वजनांपैकीं दुसेरी, अडेसरी म्हणजे अडिसरी, सेर, पावसेर व पासेरी म्हणजे पांचशेरी इतक्या वजनी मापांचे उल्लेख एका लीळेंत येतात ( गो. ५३ ). उत्तरार्धात एका ठिकाणीं अर्धा मण चणे घातल्याचा निर्देश आहे ( २९२ ). ' पळ ' म्हणजे अठ्ठावीस टबू हेंहि एक वजन असून अशा बावन पळांचें ताट








आणल्याचा उल्लेख गोविंदप्रभुचरित्रांत येतो ( गो. १६५ ). गुंज, वाल, जऊ, तोळी, दुतोळी व मासा हीं वजनें मुख्यतः सोनें वजन करण्यासाठीं वापरीत असें दिसतें ( गो. ३०६ ). गुंजांचा उपयोग कापूर वजन करण्याकडेहि झालेला दिसतो (गो. २९३ ). सोन्याचीं जशीं वजनें तसे भिन्नभिन्न कसहि आहेत. पैकीं ' बावनकस ' सोनें व ' अठेचाळीस ' कस सोनें यांचे उल्लेख आढळतात (गो. ३०६ ). बाजारांतील मापांत खरीं खोटीं अशीं सर्व प्रकारचीं मापें असल्याचा पुरावा अन्य ठिकाणीं मिळतो ( गो. २१५ ).

मापनाचा विचार करतां ' गाउ किंवा गांव हें एक क्षेत्र मोजण्याचें साधन असावें असें वाटतें ( उ. १०२, २६७; गो. १ ). सुमारें चार कोसांचें हें अंतर ' अव्हा चौरस ' म्हणजे औरस चौरस धरल्याचा पुरावाहि वरील लीळेंत मिळतो. उत्तरार्धांतील एका लीळेंत भटोबास ' धाप एक भूमि गेले ' असा उल्लेख असून त्यावरून ' धाप ' हें एक भूमापन असून एका दमांत तोडतां येईल इतकें अंतर त्यांतून सूचित होत असावें असें दिसतें. ( उ. ३३३ ). याच भागांत चक्रधरांनीं सात मात्रांचा ओटा करविल्याचा उल्लेख येतो व त्यावरून ' मात्रा ' हेंहि क्षेत्रमापनाचें एक साधन असल्याचें कळून येतें ( उ. ३५५ ).

## सण व सोहोळे

मनुष्य हा उत्सवप्रिय प्राणी आहे. नाना प्रकारचे उत्सव साजरे करून त्यांत रमून जाणें त्यास बहुत मानवतें. या नियमास यादवकालीन महाराष्ट्रीय समाज अपवाद नाहीं, हें प्रस्तुत चरित्रग्रंथांची वरवर पाहणी करणारासहि कळून येईल. अधिक खोलांत शिरल्यास तत्कालीन सणासोहळ्यांची तपशीलवार माहिती मिळूं शकते. ती अशी : मुलाचें बारसें आणि उष्टावण साजरें केल्याचा निर्देश एका ठिकाणीं असून ( ए. १५ ), अन्य प्रसंगीं बारशानिमित्त गांवजेवण घातल्याचें वर्णन आलें आहे ( गो. ९१ ). मौंजीबंधन हा एक धार्मिक विधि असला, तरी त्यास आलेलें सामाजिक सोहळ्याचें स्वरूप यादवकालांतहि दृष्टोत्पत्तीस येतें. गोविंदप्रभुचरित्रांत एका ठिकाणीं 'वऱ्हाड कीजे ऐसी मुंजि केली' असें स्पष्टपणेंच म्हटलें आहे ( गो. २७७ ). वऱ्हाड करणें म्हणजे लग्नाचा सोहळा करणें. पूर्वार्धांत एका ठिकाणीं मुंजीनिमित्त वऱ्हाड जमल्याचा व मांडे, पुऱ्या, लाडू, सरवळे, तिळोवे इत्यादि पक्वान्नांचा थाट केल्याचा उल्लेख असून उत्तरार्धांत मुंजीनिमित्त झालेल्या जेवणावळीस अवघा गांव आवंतल्याचा निर्देश येतो ( पू. १९३; उ. ६५ ). एक धार्मिक विधि या दृष्टीनें मौंजीव्रताचें वर्णन गोविंदप्रभु-चरित्रांत आलें असून त्यांत मौंजीबंधन, ' शिखासूत्र कासोटी, ' पळसुला, ' वों भवति भीक्षां देहि ' या परिचित गोष्टी आढळून येतात ( गो. १ ). विवाहोत्सवाचीं वर्णनें अनेक ठिकाणीं आलीं असून तत्कालीन चालीरीतींचें ज्ञान करून घेण्याच्या दृष्टीनें तीं महत्त्वाचीं आहेत. पैकीं पहिलें वर्णन चक्रधरांच्या द्वितीय विवाहाचें असून त्यांत ' गोधोळी 'च्या म्हणजे गोरज मुहूर्ताचा व चार दिवस ' वऱ्हाडीक ' झाल्याचा उल्लेख आहे ( ए. १६ ). एकांकांतील दुसऱ्या एका लीळेंत एका लग्नघराचें वर्णन असून त्यांत लग्नाचें वऱ्हाड, वऱ्हाडीं, मांडव, जानवसा, मूळ, तांबुळें म्हणजे पानसुपारीचा समारंभ व विडेवस्त्रें म्हणजे मानपान इतके उल्लेख येतात ( ए. ४८ ). उत्तरार्धांतील एका लीळेंत लग्नाच्या तयारीचा म्हणजे वळिवट, पापड, कुरवड्या इत्यादि खाद्य-पदार्थ केल्याचा उल्लेख असून नवरदेवास ' कैसी नोवरकळा-नोवरछाया-साजती असे ' असें विनोदानें म्हटलें आहे ( उ. ३४२ ). आजच्याप्रमाणें तेव्हांहि वधूवरांची लग्नानंतर ' वरात ' निघे व ती गोविंदप्रभूसारख्या ज्येष्ठाच्या पायां पडण्यास येत असें एका लीळेवरून कळतें. ' वऱ्हाड होणें ' हा वाक्प्रचार लग्न होणें या अर्थी याच लीळेंत आढळतो ( गो. २८९ ). तसेंच गोविंदप्रभूंनीं केलेल्या लग्नाच्या नाटकाचें सर्वच वर्णन वाचनीय असून या एका लीळेवरून किती तरी प्राचीन चालीरीतींवर प्रकाश पडूं शकतो. या प्रसंगीं गोविंदप्रभूंनें दोन तोंगलांचें बासिंग बांधलें, कांकण आणि ' डाउ ' म्हणजे लग्नाची सुपारीहि बांधली, भक्तजनांनीं त्यास हळदीनें उटिलें, मांडव सजला, बोहोलें उभें राहिलें, तुरें म्हणजे मंगलवाद्यें वाजूं लागलीं, वळिवट वेळले, तुपाचे सांगड उलवले, अवघें वेलौर गांव जेऊन








तुपाचे पाट वाहिले, व चौथ्या दिवशीं 'साडे' होऊन ही चार दिवसांची वऱ्हाडीक संपली, असें वर्णन म्हाइंभट करतो. विवाहोत्तर भोजनसमयीं गोविंदप्रभूनें आपल्या बालस्वभावास अनुसरून भाकरी मागितली तेव्हां 'जी जी, वऱ्हाडीं भाकरी कैसी जी!' हें आवाइसेनें दिलेलें उत्तर सूचक आहे (गो. २२४). उत्तरार्धात एका ठिकाणीं बालविवाहाचें वर्णन आलें असून त्यांतील 'साता वरिखांचा नोवरा' व 'पांचा वरिखांची नोवरी' यांनीं विडी तोडल्याचें व उष्टी 'भेली' म्हणजे गुळाचा खडा चाखल्याचें व वडील मंडळींनीं त्यांचें 'कोडकवतिक' केल्याचे उल्लेख मनोरंजक वाटतील (उ. ११७). तसेंच म्होतुरांतील आचारधर्माचें वर्णन अन्य ठिकाणीं आलें असून समाजशास्त्रदृष्ट्या तें महत्त्वाचें आहे. या लीळेंत म्होतुरधर्म सांगतांना गोविंदप्रभु म्हणतात— "रांडे बाइले पाटु तरि आधीं पांढरें साउलें (वस्त्र) देयावें: मग मांजिठें देयावें: आधीं दोनी पोळिया वाढाविया: मग चारी वाढाविया: आधीं तेल ठोंबरा वाढावा मग तूप तांदुळ वाढावे." सांडीशीं म्हणजे परित्यक्तेशीं पाट लावला असतां आचरावा लागणारा धर्म याच्या उलट असून तो सांगून गोविंदप्रभु पुढें म्हणतात— "सेजारीं बाज घालावी: एऱ्हवीं आगि लागैल: मग नांदो अथवा न नांदो: परि पाटु दामु रोकडा" (गो. १५५). गोविंदप्रभूनें सांगितलेला व रिधपुरांतील महाजनांस मान्य असलेला हा म्होतुराचा आचारधर्म चिंतनीय आहे. यावरून म्होतुर किंवा पाट एक तर विधवेशीं किंवा परित्यक्तेशीं लावला जाई व त्यासाठीं 'रोकडा दाम' खर्चावा मोजावा लागून वर ही पाटाची बायको नांदेलच अशी शाश्वती नसे, इतकी निश्चित स्वरूपाची माहिती कळते.

इतर सामाजिक सणांपैकीं दिवाळी व शिमगा या दोन सणांचे उल्लेख सर्वांत अधिक येतात. पैकीं हिवरळी येथें चक्रधरांनीं जो दिवाळसण आपल्या भक्तांसमवेत साजरा केला त्याचें विस्तृत असें वर्णन म्हइंभटानें केलें आहे. या दिवाळसणाच्या आदल्या दिवशीं सांजवेळेस महदायिसेनें 'पाणीयाची सामग्री' सिद्ध करून चिकसा म्हणजे उटणें व तेल आणून ठेवलें. दुसऱ्या दिवशीं सर्वजण 'थोर पहानपटीं' म्हणजे भल्या पहाटेस उठलीं व प्रातर्विधि झाल्यावर महदायिसेनें सर्वांस ओवाळलें. त्यानंतर चक्रधरांची मर्दना झाल्यावर भक्तजनांनीं एकमेकांच्या अंगास चिकसा म्हणजे उटणें लावलें व डोक्यावर 'भोगी' घालून सर्वांचीं स्नानें झालीं. नंतर महदायिसेनें 'अक्षेवाणें' आणून सर्वांना पुन: एकदां ओवाळलें व सर्वांच्या कपाळीं चंदनाचे टिळे दिले. इतकें होतें तों दिवस निघाला व मग चक्रधरांचा 'नेमस्त पूजावसर' होऊन सर्वांचीं जेवणें झालीं व विडेतांबूळ होऊन या दिवाळसणाची इतिश्री झाली (पू. २७८). पुढें भाऊबीजेच्या दिवशीं येल्हाइसेनें चक्रधरांच्या ठायीं भाऊबीज केली व अवघ्या चार दामांत सोजीच्या लाडूंचा थाट उडवून दिला (पू. २८०). दिवाळींतील स्नानाचा उल्लेख उत्तरार्धांतहि आलेला असून त्या प्रसंगीं सकाळच्या वेळीं कोणी 'पाटाउ पासोडी' तर कोणी 'खळींचीं वोलि सांउलें' याप्रमाणें श्रीमंती वस्त्रें परिधान करून, न्हाऊन व टिळेतांबूळ करून गांवांतील महाजन चक्रधरांच्या दर्शनास आल्याचें म्हाइंभट सांगतो (उ. १८६). दिवाळींतील पाडव्यास नगरस्त्रियांनीं येऊन गोविंदप्रभूंस ओवाळल्याचा व ओवाळणी म्हणून त्यांना चोळी किंवा ती अंगास न आल्यास चोळीच्या किंमतीचे 'लेख' म्हणजे रोख द्रव्य मिळाल्याचा उल्लेख अन्य ठिकाणीं येतो (गो. १५२). तसेंच या पाडव्यास डोईस 'मोरपिसांची वेठी' व हातीं चिपळ्या अशा वेषांत वासुदेव कांहीं गाणें गात येई व त्यास भीक्षा म्हणून 'पसाय'दान मिळे असें दुसऱ्या लीळेवरून कळतें (गो. १५४). शिमग्याच्या सणाचीं वर्णनें याहूनहि अधिक प्रमाणांत आढळतात. या वर्णनांतून होळी रचणें, उपाध्यायाकडून तिची शास्त्रोक्त प्रतिष्ठा करविणें, होळीस माडा बांधून, नैवेद्य दाखवून प्रदक्षिणा घालणें व मग होळी पेटवून देणें इत्यादि विधींचे उल्लेख आले असून त्यावरून चालीरींतींचे सातत्य चांगलें ध्यानांत येतें (उ. २०). त्याप्रमाणेंच जसें आज तसें सातशें वर्षांपूर्वींहि शिमग्याच्या सणाचें स्वरूप मुख्यतः धार्मिक नसून सामाजिक असावें ही गोष्ट कांहीं लीळांवरून स्पष्ट








होते. एकदां सारंगपंडित हे सहकुटुंब चक्रधरांच्या दर्शनास आले असतां ते शिमग्याचे दिवस असल्यानें त्यांनीं मठांत न राहतां गांवांत बिऱ्हाड करावें अशी स्पष्ट सूचना चक्रधरांनीं त्यांस दिली. त्यावर 'गोसावी असतां आम्हासि काइसें भयें ?' असें सारंगपंडितांनीं म्हटल्यावरून चक्रधरांनीं त्यास पुढील उत्तर दिलें : 'या देखतां हाटाचा चोहटां तोंडिचा तोंडीं थापबेन्हीं मारिजाल' (उ. २०). यावरून हें स्पष्ट होतें कीं, तेव्हांहि शिमग्याच्या दिवसांत बीभत्स प्रकार होत व आपणांसमक्ष ते होणार नाहींत अशी खात्री चक्रधरांसारख्या मान्यवर पुरुषासहि वाटत नसे. स्वतः चक्रधर शिमग्यांतील धुळवडीचा खेळ खेळले असून त्यावरून एकमेकांच्या अंगावर राख, माती व चिखल उडविणें आणि 'हो जेरे, हो जेरे' असें मोठ्यानें म्हणत 'सिंपणें' म्हणजे धुळवड खेळणें हा प्रकार सातशें वर्षांपूर्वीहि लोकप्रिय दिसतो (पू. १९९; उ. २१). गोविंदप्रभु तर वृद्धाप्य आलें असतांनाहि धुळवड खेळले असून त्यांत त्यांचे 'धाकुटेपणींचे सवंगडें'हि म्हातारपणीं सामील झाले असल्याचा पुरावा मिळतो. या प्रसंगीं 'आरे ! धूर, धूर' असें मोठ्यानें म्हणत लहानथोर सर्वजण मृदंग, काहाळा, तुरें, टिपरी इत्यादि वाद्यांच्या गजरांत धोट्यांनीं म्हणजे पिचकाऱ्यांनीं एकमेकांच्या अंगावर सिंपणें म्हणजे जलसिंचन करीत (गो. २८०). तसेंच शिमग्याच्या दिवशीं गांवांतील शिष्ट 'टिळेतांबूळ' करून इकडे तिकडे मिरवीत (उ. २४), व देवळांतून नर्तिकांचें नाचकाम होऊन त्या धोट्यांनीं रंगहि खेळत असें कळतें (गो. ६४). शिमग्याप्रमाणेंच 'पोळ्याची आंवस' हाहि एक सामाजिक उत्सव असून त्या दिवशीं गांवांतील बैल शृंगारीत असें दिसतें (गो. ३०९). जयंतीचा म्हणजे कृष्णजन्माचा उत्सव साजरा केल्याचाहि उल्लेख सांपडतो (उ. १०३). तसेंच चक्रधरांसारखे थोर पुरुष गांवांत आले असतांना सडे-संमार्जन करणें, गुढ्या उभारणें, 'मखर-मांडळी' करून भागवतांचा मेळावा जमविणें व 'गात वात नाचत' त्यांना सामोरें जाऊन महोत्सव साजरा करणें हाहि प्रकार नित्याचा दिसतो (पू. ४३).

### अंत्य संस्कार

प्रस्तुत चरित्रग्रंथांत मृतांची व्यवस्था एकूण तीन प्रकारांनीं केल्याचे दाखले आढळतात. पैकीं 'निक्षेप' करणें किंवा मूठ माती देणें म्हणजे मृतास पुरणें हा प्रकार विशेष रूढ दिसत नाहीं. गोविंदप्रभूसारख्या साधूस मात्र पुरण्याचा प्रघात असावा. त्यांचा मृत देह निक्षेप म्हणजे खड्डा खणून खालीं हातभर गादी घालून त्यांत कोणाच्या मतें उघडाच तर कोणाच्या मतें वस्त्रांत गुंडाळून पुरल्याचें म्हाइंभट सांगतो (गो. ३२३). लीळाचरित्रांतहि एका ठिकाणीं चक्रधरांनीं एका ब्राह्मणास कुदळी-पाटी घेऊन मूठमाती दिल्याचा उल्लेख आहे. (ए. १४). मृत बालकास शेतांतील पाणदींत पुरत, असें वाटतें (गो. ८). मृतास जलसमाधि देणें हा आपद्धर्म दिसतो, व त्याप्रमाणें चक्रधरांनीं मृताची मोट बांधून ती जड व्हावी म्हणून आंत शाळिग्राम किंवा तांदूळ यासारखा वजनदार पदार्थ घालून 'जळनिक्षेप' करविल्याचे दोन निर्देश आढळतात (उ. ४८, २५५). दहनाचा प्रकार सर्वांत अधिक रूढ दिसतो व दहनाचीं तपशीलवार वर्णनें दोनचार ठिकाणीं येतात. त्यांतील तिकटें म्हणजे तिकाटणें तयार करून त्यांत विस्तवाचें गाडगें घालून तें मृताबरोबर स्मशानांत नेणें, मृतास तिरडीवर घालण्यापूर्वी त्यास उत्थानपिंड देणें, स्मशानांत गेल्यावर सरण रचून आधीं स्मशानपिंड देऊन मग मृतास सरणावर ठेवणें, त्याच्या पायथ्याशीं अग्नि पेटविणें, प्रेतास धार देणें, घागर फोडणें, मृताचें कपाळमोचन होईपर्यंत स्मशानांत थांबून तें झाल्यावर सचैल स्नान करून ओल्या धोतरानिशीं परतणें, इत्यादि क्रिया किरकोळ फरकानें अद्यापिहि चालू आहेत. यादवकालांत प्रेतासाठीं किडडी म्हणजे तिरडी तयार करून ती चौघांच्या खांद्यांवरून स्मशानांत नेत व प्रेताबरोबर जाणारे डोक्यावरून वस्त्राची 'खोल बुंथी' म्हणजे पदर घेत अशीहि माहिती मिळते. दहनक्रियेंतील तपशिलाच्या दृष्टीनें तीन लीळा वाचनीय आहेत (उ. २६३; गो. १३८, ३००). प्रेत वाहण्याच्या तिरडीस आवाज करणाऱ्या घागऱ्या किंवा घुंगरें बांधण्याची पद्धति रूढ असावी असें 'मर मर पोरा, तुझिए मढा बांधें घागरा, जा मसणवेन्हीं












टुं टुं करीत ' या बाइसेच्या तोंडीं वारंवार येणाऱ्या शिवीवजा वाक्प्रचारावरून वाटतें ( पू. ४६, ३७२ ). याच आचारावरून ' घागरा बांधणें ' हा वाक्संप्रदाय महानुभावीय गद्यांत हजेरी घेणें, शिवी देणें या अर्थी रूढ झालेला दिसतो. विशिष्ट सामाजिक चालीरीतींवरून भाषेंतील वाक्प्रचार कसे निर्माण होतात हें येथें पाहण्यासारखें आहे. ' कारट करणें ' या मराठींतील वाक्संप्रदायाचें मूळहि और्ध्व-देहिक क्रियाविषयक प्राचीन आचारांत असून या दृष्टीनें उत्तरार्धातील एक लीळा उल्लेखनीय आहे. या लीळेंत चक्रधरांनीं डखाले नांवाच्या एका शिष्याचा ' कारटु ' केल्याचें सविस्तर वर्णन आढळतें ( उ. ३४२ ). तिकडे, ' विसदेयाची तौली ' म्हणजे विस्तवाचें मडकें आणि वाक यांचा एकत्र उल्लेख अन्य ठिकाणीं आढळतो ( उ. ४३३ ). स्मशानांतील महार ही संस्थाहि जुनी असून प्रेता-वरील वस्त्रांवर या महाराचा हक्क असावा असें दिसतें ( ए. १६२ ). मरतांना मांडी देण्याची रीतहि जुनीच असून तिचा उल्लेख लीळाचरित्रांत येतो ( ए. ३२ ). प्रेताचे आंगठे बांधून त्यास तिरडीवर घालून तें खांद्यावरून स्मशानांत वाहून नेणें व तेथें त्यास अग्नि देऊन घडा फोडणें इत्यादि अंत्यसंस्कार करण्याचें काम मृताच्या पुत्राकडे असें व त्या दृष्टीनें या विधीस ' पुतावो ' म्हणत असें एका लीळेवरून कळतें ( पू. १४३ ). पितृमरणा-नंतर पुत्रास क्षौर करून सुतकहि पाळावें लागे ( ए. ६१ ). सुतकाचा व तें फिटल्यानंतर अवश्य अशा स्नानविधीचा स्पष्ट उल्लेख गोविंदप्रभुचरित्रांत आहे ( गो. ३६ ).

वेश्या

वेश्याव्यवसाय अतिप्राचीन काळापासून चालत आलेला असून त्याचे अनेक उल्लेख प्रस्तुत चरित्रग्रंथांतून आढळतात. ' लिसीपुसी ' म्हणजे थाटमाट करणें हा वेश्यांचा धर्म समजला जाई ( उ. ३४० ). तसेंच वेश्यांच्या ' ठायीं वसणारा ' म्हणजे त्यांनीं ठेवलेला एकादा पुरुष असे व त्याच्या विरहानें त्यांना ' अवस्था ' म्हणजे तळमळ लागे ( उ. ४१९ ). क्वचित् असेंहि घडे, कीं जन्मभर जगाचे म्हणजे परपुरुषांचे ' कवडे ' खाऊन वेश्या शेवटीं एकाची होई व त्याच्या मरणाबरोबर आपणहि अग्निप्रवेश करी ( उ. ५०० ). वेश्या जशा चक्रधरांसारख्या साधूच्या दर्शनास, तशाच रामटेक-च्या यात्रेसहि जात ( उ. ३३९; गो. ४४ ). एका वेश्येच्या पाठीवर झालेला व्रण व त्यांतील पू यांचा उल्लेख वरील लीळेंतच येतो ( गो. ४४ ). कोणी श्रेष्ठ पुरुष गांवांत आला असतां वेशीपाशीं सामोरें जाऊन वेश्यांनीं त्यास ओवाळण्याची रीत असावी ( गो. १०५ ). या दोन चरित्रग्रंथांतून वेश्येस ' सामान्य स्त्री ' व वेश्यांच्या वसतीस ' सामान्य-स्त्रीहाट ' म्हटल्याचें आढळून येतें ( ए. ६९ ).

---

# तुझें बोलणें

सोडवितां सोडवेना
तुझ्या दारींचा उम्बरा
तुझें मिठास बोलणें
माझ्या आवडे अन्तरा. १

क्षण अनन्त जाहले
धन्य तुझ्या संगतींत
माझी युगांची पुण्याई
न्हाली प्रयाग-तीर्थांत. २

पडतात कानांवर
तुझे गोड गोड बोल
करी श्रवणभक्ति मी
असा होऊनि अबोल ३

सांज उलटली तरी
कानीं अमृताची वाणी
राधिकेचा भोळा श्याम
उभा मोहून अंगणी ! ४

—सूर्यकान्त खाण्डेकर








प्रा. प्र. रा. दामले

# आपल्या देशाची सद्यःस्थिति आणि शिक्षित मध्यमवर्ग

प्रस्तुत लेखक शिक्षक आहे व शिक्षकाचा पेशा त्यानें स्वखुशीनें पत्करला असून त्यांत त्याला समाधान आहे. राजकारण व शिक्षण हे दोन्ही आपला संपूर्ण वेळ द्यावयाचे व्यवसाय आहेत अशी त्याची समजूत असल्यानें, शिक्षकानें राजकारणांत भाग घेणें, त्यांत मानाचें स्थान मिळविण्याचा प्रयत्न करणें, कोणा एका राजकीय पक्षाशीं विशेष सख्य ठेवणें हें त्यास पसंत नाहीं. सामान्यतः राजकीय कार्यकर्ते व शिक्षक यांनीं एकमेकांस स्वतंत्रपणें राष्ट्रसेवा करूं द्यावी असें त्याचें निश्चित मत आहे. परंतु शिक्षक हाहि राष्ट्राचा सामान्य घटक आहे व आपली परिस्थिति समजावून घेऊन त्यावर विचार करणें हें त्याचें कर्तव्य आहे. बहुतेक शिक्षक अधिकांत अधिक मध्यमवर्गीय असतात, म्हणून या वर्गाच्या मनांत येणारे सद्यःस्थितिविषयक प्रश्न, अडचणी, शंका, भीति, व आशा यांचें थोडक्यांत विवेचन करण्याचा प्रयत्न करण्याचें येथें योजिलें आहे. या लेखनास आतां विशेषतः प्रवृत्त होण्याचीं कारणें दोन. पहिलें, रा. शंकररावजी देव यांच्या ' मध्यमवर्गाची राज्यनिष्ठा ' या ' नवभारता ' मधील ( मे, जून, जुलै १९५० ) लेखमालेंत या वर्गाच्या भूमिकेबद्दल केलेली विधानें वाचनांत आलीं व त्यांस उत्तर देणें अवश्य वाटलें. दुसरें, आगामी निवडणुका. मतदार म्हणून मतें देण्याबाबत जे विचार आपल्या मनांत येतात व ज्यांचा इतरांनींहि विचार करावा असें आपणांस वाटतें त्यांचें दिग्दर्शन प्रसंगोचित वाटलें. लेखकाच्या मतें शिक्षकास विद्यार्थ्यांच्या शिक्षणाव्यतिरिक्त देशसेवा करतां येईल. ती हीच कीं, भोंवतालच्या परिस्थितीबद्दलचे आपले विचार संधि मिळाल्यास इतरांच्यापुढें विचारविनिमयाकरितां मांडणें.

वर उल्लेख केलेल्या रा. देव यांच्या लेखमालेंत अनेक विषयांची संकीर्ण चर्चा होती. परंतु त्यांत मुख्यतः असें प्रतिपादन केलें होतें कीं, सुशिक्षित मध्यमवर्गाला आपल्या देशांत स्थापन झालेल्या निधर्मी राज्याच्या स्वरूपाचें योग्य आकलन झालेलें नाहीं; व त्यामुळें त्याची भूमिका रचनात्मक सहृदय सहकाऱ्याची नसून, सहानुभूतिशून्य टीकाकाराची आहे. शिवाय श्री. देव यांच्या लेखांतून असेंहि सूचित होतें कीं, हें राज्य मिळविण्याच्या खटपटींत या वर्गानें फारच थोडा भाग घेतला असल्यानें वास्तविक त्याला प्राप्त परिस्थितींतील दोषांबद्दल टीका करण्याचा नैतिक हक्कच पोंचत नाहीं व कदाचित् या आजच्या टीकाकारांच्या मागील चुकारपणामुळेंच परिस्थितींत हे दोष आले असतील.

सुशिक्षित मध्यमवर्गानें स्वराज्यस्थापनेच्या चळवळींत पुरेसा भाग उचलला नाहीं असें गृहीत धरलें, तरीहि सर्व हिंदी जनतेच्या आकांक्षेचे प्रतिनिधी म्हणवीत असलेल्या पक्षाच्या कार्यकर्त्यांनीं जें स्वराज्य मिळविलें त्याचा लाभ त्यांनाहि झाला असल्यानें, त्याबद्दल मतप्रदर्शन करणें हा त्यांचा हक्क त्यांनीं गमाविला, असें होत नाहीं. लोकशाहीचे सामान्य प्रजाजन म्हणून हा त्यांचा हक्क अबाधितच आहे. त्यांना या राजवटीचे गुणविशेष कळत नसतील व तिचें अंतरंग समजत नसेल, तर तें त्यांस योग्य तऱ्हेनें समजावून देणें हें या राजवटीच्या खऱ्या हितचिंतकांचें कर्तव्य त्यांनीं अवश्य बजवावें. याबाबत एक गोष्ट लक्षांत ठेवणें अवश्य आहे ती अशी कीं, परकीय सत्ता नाहींशी झाल्यानें, प्रस्थापित राज्याबद्दल व राजवटीबद्दल असमाधान व्यक्त करून कुणाला खुष करण्याचा संभव आतां








नाहीं. तेव्हां सुशिक्षित मध्यमवर्गास कांहीं खरोखरच बोचत आहे, असें मान्य करूनच विवेचन करणें योग्य होय.

मध्यमवर्गांतील व्यक्तींच्या मनांत जे अनेक प्रश्न उभे राहतात ते असे :

१. स्वराज्य कसें मिळालें ? २. स्वराज्यानंतर देशांतील सर्वसामान्य जनतेचें जीवन थोडें तरी सुसह्य झालें आहे का ? ३. हिंदुस्थानला आंतरराष्ट्रीय जगांत कांहीं महत्त्वाचें स्थान आहे हें खरें का ? स्वयंपूर्ण, सुसंस्कृत व प्रभावी असा आपला देश व्हावयाकरितां कांहीं रचनात्मक कार्य सुरू आहे का ? ५. कॉंग्रेस राजवट गेली तर काय होईल ? --या प्रश्नांची चर्चा केली तर श्री. देव यांच्या लेखमालेंतील विधानांबद्दल सुशिक्षित मध्यमवर्गाची भूमिका काय आहे तें स्पष्ट होईल.

स्वराज्य कोणीं व कसें मिळविलें हा प्रश्न विचारणें हेंच पुष्कळांस अयोग्य वाटतें. 'राष्ट्रसभेनें इ. स. १९२० पासून गेलीं अनेक वर्षे चळवळ करून तिच्या सभासदांनीं स्वार्थत्याग केला, व गांधीजींच्या नेतृत्वाखालीं स्वराज्य मिळविलें हें सोपें व स्पष्ट उत्तर असतां असें आडरानांत शिरण्याचें कारण काय ? हा शुद्ध नास्तिकपणा होय,' असें त्यांस वाटतें. असा प्रश्न कोणी विचारला तरी त्याचा अर्थ असा नव्हे कीं, कॉंग्रेसनें चळवळ केली नाहीं, किंवा गांधीजी फार मोठे नेते नव्हते किंवा त्यांच्या चळवळीचा ब्रिटिशांनीं हिंदुस्थान सोडण्याशीं संबंध नाहीं. परंतु सत्यनिष्ठेनें या प्रश्नाचा विचार केला तर असें दिसून येतें कीं, दुसरें जागतिक महायुद्ध झालें नसतें तर स्वराज्य निदान आणखी ५० वर्षे मिळण्याची शक्यता नव्हती. दुसऱ्या महायुद्धानें चीन स्वतंत्र झाला, ॲबिसीनीया स्वतंत्र झाला, ब्रह्मदेश स्वतंत्र झाला, फिलिपाइन बेटें स्वतंत्र झालीं, इंडोनेशिया स्वतंत्र झाला. जागतिक परिस्थिति अनेक महत्त्वाचे बदल घडवून आणीत असते. आपल्या राष्ट्रासारखें मागासलेलें राष्ट्र हें मोठ्या राष्ट्रांच्या बुद्धिबळाच्या खेळांतील प्याद्यासारखें आहे. शिवाय, इंग्रजांऐवजीं दुसरे कोणी जर आपले राज्यकर्ते असते, तर इतक्या शांततेनें व लवकर स्वराज्य मिळालें असतें का, ह्याचाहि विचार करण्यासारखा आहे. आय्. एन्. ए. चळवळ एका अर्थी अयशस्वी झाली असली, तरी कॉंग्रेसच्या पदरांत स्वराज्य पडण्यास तिचाहि उपयोग निर्विवाद झाला. इतकेंच नव्हे तर, ती झाली नसती तर ब्रिटिशांनीं हा देश सोडण्याची घाई करणें असंभवनीय होतें असेंच इतिहास म्हणेल. इंग्रज हा स्वार्थी असला तरी धोरणी व व्यवहारीहि आहे. केव्हां नमतें घ्यावें हें त्यास कळतें. १९२० ते १९४७ पर्यंतच्या सर्व चळवळी लक्षांत घेतल्या व प्रामाणिक आत्मनिरीक्षण केलें तर असें कबूल करणें भाग आहे कीं, ३०-४० कोट जनतेचें १५० वर्षे गेलेलें स्वातंत्र्य मिळविण्याकरितां जो स्वार्थत्याग व ज्या हालअपेष्टा सहन कराव्या लागाव्या त्याच्यापेक्षां कितीतरी कमी हिंदी जनतेनें केल्या आहेत. ब्रिटिश अमदानीबद्दल असंतोष निदान सुशिक्षितांमध्यें निर्माण केला गेला, म्हणून पुढील निदर्शनात्मक ( Mass Demonstration ) चळवळीचें बीज रोवतां आलें. म्हणून स्वराज्य कोणीं व कसें मिळविलें या प्रश्नाचें योग्य उत्तर असें कीं, कॉंग्रेस स्थापन झाल्यापासून सुभाषचंद्रांच्या I.N.A. पर्यंत जे जे जागृतीचे प्रयत्न झाले व चळवळी झाल्या व ज्यांस गांधीजींच्या असामान्य व्यक्तिमत्त्वानें व राजकारणपटुत्वानें प्रभावी केलें, त्यामुळें जागतिक परिस्थितीमुळें अपरिहार्य असलेलें स्वराज्य कांहींसें लवकर व शांततेनें मिळालें. शांतता ही पूर्ण नव्हतीच. देशविच्छेदनाची किंमत देऊन व त्यानंतरचे अनेक वाईट प्रसंग सोसूनच स्वराज्य पदरांत पडलें.

सुशिक्षित मध्यमवर्गानें स्वराज्यस्थापनेंत मदत केली नाहीं व आतां स्वराज्यांतील परिस्थितीबद्दल तो सहानुभूतिपूर्ण विचार करीत नाहीं, या विधानांत सत्य असलें तरी तें फार थोडें आहे असें विचारांतीं कोणाच्याहि लक्षांत यावें. 'He runs best who runs last' या न्यायानें स्वराज्यप्राप्तीच्या वेळीं आजच्या कॉंग्रेसचे अनुयायी त्यांतल्यात्यांत सक्रिय चळवळ करीत असल्यामुळें त्यांचें सरकार ( Successor Govt. ) झालें तें योग्यच झालें. परंतु केवळ त्यांच्याच परिश्रमानें स्वराज्य मिळूं शकलें नसतें. शिवाय त्यांतहि सुशिक्षित मध्यमवर्ग मुळींच नव्हता काय ? क्षणभर असें मान्य केलें कीं, सुशिक्षित

मध्यमवर्गांतील अनेक लोक परिस्थितीमुळें व मतभेदांमुळें तटस्थ होते व अगदीं गरीब व फार श्रीमंत अशा व्यक्तींप्रमाणें त्यांना जीवनाशीं खेळ खेळणें कठिण असल्यामुळें तसे ते असणें एका अर्थी अपरिहार्य होतें, तरीहि त्यांचा प्राप्त स्वराज्याबद्दल मत असण्याचा हक्क जातो काय? शिवाय १९२० पर्यंतची चळवळ तर प्रायः त्यांनींच केली याबद्दल शंका नाहीं. ती झाली नसती, तर पुढल्या चळवळी होऊं न शकत्या व झाल्या असत्या तरी फलद्रूप झाल्या नसत्या. आजच्या कॉंग्रेसच्या नेत्यांपैकीं अनेकांचा हा गैरसमज आहे. पंडित नेहरू यांच्यासारख्या बुद्धिमान् पुढाऱ्याचीहि याबाबतींत प्रामाणिक गैरसमजूत दिसते. पंडित नेहरू बुद्धिमान्, सुसंस्कृत व लहानमोठ्या समाजांत धोरणानें वावरायची संवय असलेले गृहस्थ असल्यानें त्यांची या बाबतींतील मतें ते दुसऱ्यास शक्य तों न दुखवितां तात्त्विक भूमिकेवरून मांडतात. तरी पण, त्यांनाहि गांधीयुगापर्यंतच्या अर्वाचीन हिंदुस्तानच्या इतिहासाची असावी तितकी जाणीव दिसत नाहीं.

देशांतील सर्वसामान्य जनतेचें जीवन स्वराज्यानंतर थोडें तरी सुधारलें आहे का? या प्रश्नाच्या उत्तरावर स्वराज्याचें यश मुख्यतः अवलंबून आहे. सामान्य मनुष्यस्वभाव व गुलामगिरीचा न्यून-व-असमाधान-गंड यांमुळें प्राप्त परिस्थितीला दोष देण्याची हिंदी जनतेची साधारण वृत्ति आहे, यांत संशय नाहीं. तसेंच महायुद्धानें उत्पन्न झालेल्या व फाळणीमुळें वाढलेल्या अडचणींमुळें देशाचें अंतर्गत जीवनहि बिकट झालें आहे हेंहि खरें आहे. परंतु, शक्य त्या निःपक्षपातित्वानें व वस्तुनिष्ठतेनें विचार केला तरी असें म्हणणें भाग आहे कीं, अन्न, कपडा, राहण्याची सोय, शिक्षण या मूलभूत गरजांपैकीं कोठल्याहि बाबतींत स्वराज्यांतला सामान्य हिन्दी नागरिक सुखी नाहीं व होण्याचीं लक्षणें नाहींत. याचें मुख्य कारण कॉंग्रेसी प्रधानमंडळाचा अननुभव व शिकण्याची तयारी नसणें हें आहे. प्रांतीय राज्यांपैकीं माझ्या डोळ्यांपुढें विशेषतः मुंबई राज्य आहे. तें त्यांतल्या त्यांत पुढारलेलें आहे असें म्हणतात. आपली शक्ति लक्षांत न घेतां आकाशाला गवसणी घालणारे बेत करावयाचे, त्याला योजना ( Planning ) म्हणावयाचें व होण्यासारख्या, साध्या, लहान गोष्टीहि प्रत्यक्ष आचरणांत आणल्या जातील हें पाहावयाचें नाहीं, अशी प्रायः स्थिति आहे. शिक्षणाचें उदाहरण घेतलें तर 'हल्लींचें शिक्षण टाकाऊ आहे' या अर्धसत्याखेरीज इतर कांहींहि कॉंग्रेसच्या अनुयायांस समजलेलें दिसत नाहीं. गांधीजींच्या जीवनदृष्टीचें उदाहरण म्हणून 'मूलोद्योग-शिक्षण-पद्धति' म्हणतात. तिचें स्वरूप—महत्त्व व मर्यादा—याचीहि जाणीव त्यांस नाहीं. गतानुगतिक सामान्य शिक्षित लोकांकडून असले प्रयोग यशस्वी होणार नाहींत, इतकेंहि लक्षांत घेतलें जात नाहीं. माध्यमाच्या प्रश्नाबद्दल कायम सुधारणा करण्याचें धैर्य नाहीं त्याचा पूर्ण अर्थ काय त्याची कल्पना असलेली दिसत नाहीं. शिक्षणाच्या निरनिराळ्या श्रेणींचा योग्य तरतमभाव, त्याबद्दलची सरकारची जबाबदारी काय, हें त्यांस समजत असल्याचा पुरावा नाहीं.—मद्यपानबंदीची मोहीम विशेषतः मुंबईराज्यांत जोरानें चालविली जात आहे. त्याबद्दल इतकी चर्चा होत आहे कीं, विशेष लिहिण्याचें कारणच नाहीं. ध्येयवादाच्या नांवाखालीं, मनुष्यस्वभाव व आपलें सामर्थ्य यांकडे दुर्लक्ष करून हा प्रयोग कां चालविला जात आहे, हें समजणें कठिण आहे. अशा अविचारानें इतर नुकसान तर होईलच, पण प्रत्यक्ष मद्यपानबंदी कायमची अशक्य होईल. या प्रयोगाचें एक अंग म्हणून नीराकेंद्र-स्थापनेचा उपक्रम जो चालू आहे, तो इतका अनावश्यक, निरुपयोगी व वेडेपणाचा आहे कीं, मुंबईसरकारचा कर्तव्याकर्तव्यविवेक अगदींच नाहींसा झाला आहे, असें वाटल्याशिवाय राहात नाहीं.

अन्नाच्या प्रश्नाबद्दल मुख्यतः केंद्रसरकार जबाबदार आहे. खरी लोकशाही नांदत असती तर त्या प्रश्नावर हें सरकार केव्हांच पदच्युत झालें असतें. नियंत्रणें—वि-नियंत्रणें या मूलभूत प्रश्नापासून कशाबद्दलच निश्चित विचार नाहीं. देशांतील अन्न वाढविणें, आहे तें योग्य रीतीनें वांटणें व लोकसंख्या हळूहळू मर्यादित करणें या तीन उपायांपैकीं तिसरा सरकारच्या ध्यानींच नाहीं. त्याबद्दल कांहीं विचार प्रकट झालेच तर ते अगदीं मध्ययुगीन असतात. वांटप न्याय्य व्हावें म्हणून काळा बाजार हा

अनुक्रमणिका








# आपल्या देशाची सद्यःस्थिति आणि शिक्षित मध्यमवर्ग

Capital offence ठरवून त्यास खुनासारख्या गुन्ह्यास होणारी शिक्षा झाली पाहिजे व मालमत्ता जप्त करण्यांत आली पाहिजे. अशीं जरी थोडीं उदाहरणें-खऱ्या व मोठ्या काळ्या बाजारवाल्यांची--झालीं तरी पुष्कळ फरक होईल. परंतु त्यांना फटक्याची शिक्षा देणें हेंसुद्धां श्री. जवाहरलालजींना रानटीपणाचें वाटतें ! प्रधानमंत्री व अन्नमंत्री यांपासून सर्वजण इतकीं भाषणें करतात व इतक्या निरनिराळ्या गोष्टी सांगतात कीं, अन्नधान्यआघाडी ही केवळ भाषणानींच जिंकणें शक्य असतें तर आपण केव्हांच यशस्वी झालों असतों ! जनता सहकार्य करीत नाहीं, हें पालुपद आपण अहर्निश ऐकतों. परंतु तशी वस्तुस्थिति असेल तर ती कां आहे, याचा विचार राज्यकर्ते करीत नाहींत. सरकारी उपाययोजनांवर जनतेचा विश्वास नसेल. असें असल्यास, ज्यावर जनतेचा विश्वास बसेल अशी उपाययोजना करावी किंवा तें आपणांस शक्य नसेल तर नवी राजवट निर्माण करण्याकरितां राज्यकर्त्यांनीं राजीनामा द्यावा. 'देशाचा आम्हांला पाठिंबा आहे, १०० टक्के जनतेचे आम्ही प्रतिनिधी आहों' असें म्हणविणारांस 'जनता आमचें ऐकत नाहीं' असें म्हणणें शोभत नाहीं. काँग्रेसचें आज विधिमंडळांतून बहुमत आहे हें खरें आहे. व म्हणून कांग्रेसची राजवट त्या अर्थीं लोकशाही विरोधी (undemocratic) किंवा बेकायदेशीर नाहीं. पण काँग्रेसच्या राज्याचें नैतिक अधिष्ठान समाधानकारक आहे असें आजच्या परिस्थितींत वाटत नाहीं.

नागरिकांच्या मूलभूत गरजा व हक्क यांपैकीं दुसऱ्या कांहीं प्रकारांचा विचार केल्यासहि असें दृष्टोत्पत्तीस येतें कीं, स्वराज्यानंतर या बाबतींत सुधारणा तर झाली नाहींच, उलट माघारच आहे ! हिटलर किंवा स्टॅलिन यांच्याप्रमाणें निर्दय उपायांनीं प्रतिस्पर्ध्यांस काँग्रेसी मंत्रिमंडळें नेस्तनाबूत करीत नाहींत हें खरें आहे. पण त्याचें कारण सामान्यतः हिंदी जीवन हें तितकें जोरकस नाहीं, सौम्य (mild) आहे, हें होय. भाषण, मतप्रदर्शन, राजकीय संघटन, संपाचा हक्क वगैरे नागरिक स्वातंत्र्याच्या हरएक बाबींत, परकीय सत्तेंत असतांना महायुद्धासारख्या बिकट प्रसंगीं जीं बंधनें होतीं, त्यांपेक्षां आज अधिक आहेत. निरनिराळ्या हायकोर्टांनीं बेकायदेशीर अटक म्हणून गेल्या दोन वर्षांत जितके लोक सोडले तितके लोक ब्रिटिश रियासतींत सुटले नव्हते ! कायदेमंडळें सर्वस्वीं कांग्रेसचीं आहेत. तेव्हां मन मानेल ते कायदे मंजूर करून घेतां येत आहेत. काँग्रेसेतर पक्षाच्या व व्यक्तीच्या लहानसहान उपसूचनाहि मान्य केल्या जात नाहींत असा अनुभव आहे. बिनचौकशी लांबच लांब मुदतीची अटक ही गोष्ट युद्ध किंवा तत्सम परिस्थिति याशिवाय अनेक वेळां होणें यासारखी दुसरी नागरिकस्वातंत्र्याची थट्टा नाहीं. इतकें असूनहि जनता, वर्तमानपत्रें, संस्था यांना सारखा उपदेश करण्यांत येत आहे कीं, त्यांनीं संयम बाळगावा.

इतर कांहीं असलें तरी पंडित नेहरूंच्या व्यक्तिमत्त्वानें व मुत्सद्देगिरीच्या मार्गदर्शनानें आंतरराष्ट्रीय जगांत हिंदुस्थानला मोठा दर्जा प्राप्त झाला आहे, असें आपण ऐकतों. वस्तुस्थिति अशी आहे कीं, स्वतंत्र हिंदुस्थान ही परतंत्र हिंदुस्थानपेक्षां वेगळी चीज आहे, हें सर्वांस कळतें. आपली लोकसंख्या, विस्तार, प्राचीन संस्कृति वगैरे कारणांनीं संभाव्य महत्त्वाचें राष्ट्र म्हणून आपणांस इतर राष्ट्रें लेखतात. पंडित नेहरू हे सुसंस्कृत पाश्चात्यविद्याविभूषित व या देशांत प्रिय असे नेते आहेत. त्यामुळें त्यांस मान देण्यांत येतो. परंतु याचा अर्थ असा नाहीं कीं, हिंदुस्थानला खरोखरच कांहीं विशेष आंतरराष्ट्रीय स्थान आहे. पूर्व आशियांतील इतर अनेक राष्ट्रांच्या मानानें एकसूत्री राज्यकारभार येथें आहे. इंग्रजांच्या सहवासानें कांहीं बाह्य अद्ययावत्‌पणा दिसतो. गांधीजींच्या नेतृत्वाचें तेजोवलय अद्याप आहे. परंतु वस्तुतः पं. नेहरूंचें परराष्ट्रीय धोरण त्यांच्या इतर सर्व धोरणांप्रमाणें पुस्तकी व अनिश्चित आहे. तें खऱ्या कसोटीला कसें उतरतें तें दिसेलच. पाकिस्तान व काश्मीर हे दोन मुख्य प्रश्न आपणांपुढें आहेत. पाकिस्तानबद्दल पंडित नेहरू जें करीत आहेत तेंच त्यांतल्या त्यांत योग्य आहे, असें प्रस्तुत लेखकास वाटतें. काश्मीरबाबतच्या धोरणामुळें अतोनात खर्च, आंतरराष्ट्रीय जगांत अप्रतिष्ठा व शेवटीं काश्मीरची फाळणी इतकेंच पदरांत पडेल कीं काय याची भीति वाटते. आंतरराष्ट्रीय राजकारणांत तटस्थतेचें धोरण ठेवणें हें सकृद्दर्शनीं बरोबर दिसतें. ब्रिटिश राष्ट्रकुटुंबाचे सभासद राहणें, कोरियन



अनुक्रमणिका

युद्धांत यूनोच्या ठरावास पाठिंबा देणें व उलट कम्यूनिस्ट चीनच्या सभासदत्वास मान्यता देण्यासाठीं आग्रह धरणें—या घटना तर्कदृष्ट्या सुसंगत आहेत असें म्हटलें, तरी व्यावहारिक दृष्ट्या त्या किती परिणामकारक होतात हें ठरावयाचें आहे.

काँग्रेसनें केलेलें महत्त्वाचें कार्य म्हणून नेहरूंच्या परराष्ट्रकारणपटुत्वाबरोबरच, अंतर्गत कारभारांतील सरदार पटेल यांच्या नेतृत्वाखालीं एतद्देशीय संस्थानें स्वायत्त हिंदुस्तानांत विलीन होणें ही स्वाभाविक व इष्ट घटना आहे व शांततेचा भंग न होतां तीं तशी झालीं हीहि समाधानाची गोष्ट होय. सरदार पटेल यांचें मुत्सद्दीपण, त्यांची व्यवहारकुशलता व त्यांचा दरारा यांचा या कामीं उपयोग झाला हीहि गोष्ट खरी आहे. तरी पण, या घटनेलाहि दुसरी बाजू आहे. स्वायत्त हिंदुस्तानचा राज्यकारभार सुरळीत चालूं लागल्यावर हळूहळू विलीनीकरण झालें असतें तर अधिक हिताचें झालें असतें. आज असलेल्या गोंधळांत, प्रामाणिक सार्वजनिक कार्यकर्ते व निरलस कर्तबगार अधिकारी यांची उणीव असतां आपल्या जबाबदाऱ्या वाढविणें हिताचें नव्हतें. अनेक लहान-मोठ्या संस्थानांतून शैक्षणिक, वैद्यकीय, औद्योगिक संस्था, तीं संस्थानें खालसांत जमा झाल्यावर, बंद झाल्या आहेत व प्रजाजनांच्या त्या सुखसोयी अधिक न होतां कमी झाल्या आहेत. विलीनीकरण न करतां संरक्षण, परराष्ट्रीय धोरण व दळणवळण इतक्याच बाबी मध्यवर्ती हिंदी सरकारनें ताब्यांत घेणें अधिक हितावह झालें असतें.

पंडित नेहरू वगळले तर गांधीजींच्या अनुयायांपैकीं सर्वांत अधिक कर्तबगार सरदार पटेल हे होते. त्यांस देश मुकला ही अत्यंत दुःखाची गोष्ट आहे. गांधीजी व वल्लभभाई यांची निष्ठा, धडाडी, मुत्सद्देगिरी, व्यवहार-चातुर्य या गुणांचें अनुकरण करून, अंधानुयायित्व सोडून, देशकल्याणाचा मार्ग त्यांच्याबद्दल आदर असणाऱ्या व्यक्तींनीं शोधून काढावा व आचरावा, यानेंच त्यांचे खरे उतराई होतां येईल.

सरदार पटेलांच्या निधनानें काँग्रेससंस्थेची अपरिमित हानि झाली आहे, हें स्पष्टच आहे. काँग्रेसच्या अंतर्गत राजकारणावर याचा काय परिणाम होईल, हें निश्चित सांगणें कठिण आहे. सकृद्दर्शनीं पं. नेहरूंचा पक्ष बळकट झाला असें वाटलें, तरी वल्लभभाईंच्या देशप्रेमी मुत्सद्देगिरीच्या अभावीं काँग्रेसमधील हिंदुत्वनिष्ठ कार्यकर्ते संयम सोडून निधर्मी राज्याची भूमिका प्रामाणिकपणें मान्य असणाऱ्या नेहरूपक्षीयांशीं उघड दोन हात करतील असा संभव आहे. इतकेंच नव्हे तर, नेहरू यांनीं देशांतील व काँग्रेसमधील खऱ्या प्रागतिक लोकांच्या साह्यानें धैर्यानें त्यांना तोंड न दिल्यास, काँग्रेस व कदाचित् कांहीं दिवस देशहि हिंदुत्वनिष्ठांच्या अदूरदर्शी राजकारणाचा पाठपुरावा करील अशी भीति आहे.

नेहरू व सरदार पटेल यांचीं नांवें वगळलीं, तर काँग्रेसच्या कार्यकर्त्यांतील कर्तबगार व्यक्तींची उणीव दृष्टोत्पत्तीस येते व या दोघांच्या कर्तबगारींतहि त्या परिस्थितीमुळें अनेक दोष आले आहेत. इतकेंच नव्हे तर, या देशांत खरा लोकशाही कारभार नांदण्यास अनेक वेळां या श्रेष्ठ काँग्रेसनेत्यांची वर्तणूक आड आली आहे. इतर दुय्यम नेते व अनुयायी साहजिकच त्यांच्या गुणांपेक्षां दोषांचेंच अनुकरण अधिक करूं शकत असल्यानें देशांतील सार्वजनिक जीवनास अनिष्ट वळण लागलें आहे. सहज सुचत असलेलीं कांहीं ठळक उदाहरणें द्यावयाचीं म्हटलीं तर पहिलें असें कीं, काँग्रेससंस्थेचीं अधिकारमंडळें आणि सरकारचीं विधिमंडळें व प्रांतीय व भारतीय सरकार यांचीं कार्यक्षेत्रें भिन्न आहेत, याची जाणीव काँग्रेसच्या पुढाऱ्यांस दिसत नाहीं. मद्रासच्या प्रधानावरचे आरोपाबद्दलची चौकशी करावयास त्या वेळचे काँग्रेसचे सरचिटणीस श्री. शंकरराव देव यांना नेमणें व त्यांना तद्विषयक सरकारी कागदपत्र दाखविलें जाणें ही एक सर्वांच्या आठवणींतली घटना आहे. काँग्रेसांतर्गत लोकशाहीचा नमुना पाहावयाचा, तर तो मागील एका ऑल-इंडिया-काँग्रेस-कमिटीनें नेहरू-पटेल यांच्या अनुपस्थितींत केलेला ठराव दुसऱ्याच दिवशीं राजीनाम्याच्या धाकदपटशानें त्या मंडळानें परत घेतला, तेव्हां पाहावयास मिळाला. डॉ. गिल्डर हे समारंभास हजर असतांना एका सन्मान्य डॉक्टरांनीं संततिनियमन व मद्यपानबंदी यांबद्दल आपले विचार प्रगट केले याबद्दल त्यांनीं अध्यक्षांची माफी मागितली पाहिजे, असें जाहीर रीत्या कायदे-








मंडळांत गिल्डर यांनी सांगितलें. नुकतेंच नामदार खेर यांनी विधिमंडळांतील विरोधी पक्षाचा गुणानें ऱ्हास झाला आहे, असें म्हणून त्यांस उपदेशाचे घोट पाजण्याची संधि घेतली. नामदार मुरारजी यांनी निवडणुकींत माझ्याविरुद्ध कोणी उभा राहिला तर त्याचें डिपॉझिट जप्त होईल अशी मंत्री व नेता यांस अत्यंत अयोग्य अशी प्रौढी मिरविली. मुंबईकॉर्पोरेशननें मेयरच्या निवडणुकीबाबत आज अनेक वर्षें पाळलेली नमुनेदार प्रथा, फेरोजशहा मेथा यांच्या महनीय नांवाचा उल्लेख करून, कॉंग्रेसपक्षीयांनी बहुमताच्या जोरावर मोडली.

भाषावार प्रांतरचनेच्या प्रश्नाबाबतची कॉंग्रेस-श्रेष्ठींची वृत्ति व आचार यांवरून तत्त्व व व्यवहार या दोहोंनाहि ते कसे पारखे झाले आहेत हें दिसून येतें. प्रस्तुत लेखकाच्या मतें भाषावार प्रांतरचनेचे तात्त्विक गुण कांहींहि असले, तरी हिंदुस्तानच्या आजच्या परिस्थितींत तशी प्रांतरचना करूं पाहाणें हितावह नाहीं. कॉंग्रेसच्या श्रेष्ठींचेंहि असेंच मत दिसतें. पण असें स्पष्ट सांगून त्या प्रश्नाचा सध्यांपुरता कायम निर्णय लावण्याचें धैर्य त्यांस झालें नाहीं. उलट, त्याबाबत पक्षपाती भूमिका त्यांनी घेतली व अप्रामाणिक आश्वासनें दिलीं. स्वराज्यप्राप्तीच्या चळवळींत सर्वांस सकृद्दर्शनीं सहज पटण्यासारखीं अनेक घोषवाक्यें वापरण्यांत आलीं. परंतु तीं खरीं समजणें शहाणपणाचें नाहीं. मद्यपानबंदी व मिठावरील कर या दोन बाबतींतहि अशीच चूक राज्यकर्ते करीत आहेत. सर्व जनतेस स्वास्थ्य व सुख मिळेल अशी काटकसरीची राजवट प्रस्थापित करावी, हा गांधींचा जो मुख्य उद्देश तो, त्यांचे इतर संदेश औपचारिक व गौण बाबतींत शब्दशः पाळण्याचा प्रयत्न करण्यांत, राज्यकर्ते विसरले आहेत. शिवाय गांधीजी संत असले तरी व्यवहारविमुख नव्हते व आपल्या तत्त्वांना व्यवहारांत मुरड घालण्याचें कौशल्य व धैर्य त्यांच्याजवळ होतें. आजची राजवट कॉंग्रेसची नाहीं, सर्व हिंदी लोकांची आहे अशी भूमिका घेतली गेली असती, तर अनेक लहानमोठ्या प्रश्नांबाबत ‘ धड ना तत्त्व, धड ना व्यवहार ’ अशी ओढाताण झाली नसती !

आपलें राज्य निधर्मी ( Secular ) आहे, धर्मतंत्र ( Theocratic ) नाहीं, तसें तें करण्यांत आम्ही फार महत्त्वाची सुधारणा केली, असें म्हणण्यांत येतें. ही घटनाहि प्रायः अकरणात्मक आहे. श्री. नेहरू स्वतः ती प्रामाणिकपणें स्वीकारतात. पण बहुसंख्य कॉंग्रेसानुयायांना ती समजत नाहीं व समजली तर पटत नाहीं. शिवाय अकरणात्मक घटनेंत जिवंतपणा नसतो, सामर्थ्य नसतें. Secular या शब्दाचा रचनात्मक अर्थ लक्षांत घेऊन सर्वधर्मानुयायांना योग्य अशा उच्च सांस्कृतिक भूमिकेचा प्रत्यक्ष पुरस्कार झाला पाहिजे. राष्ट्रीय स्वयंसेवकसंघांत जे कांहीं थोडे महत्त्वाचे गुण आहेत, त्यांत संस्कृति व समाजजीवन यांच्यासंबंधींची जाणीव, शिस्तीचें कांटेकोर पालन व पोकळ बडबड न करण्याची संवय हे आहेत. या रा. स्व. संघाच्या गुणांबरोबर त्याच्या दोषांचाहि उल्लेख करणें अवश्य वाटते. तो असा कीं, संस्कृति व समाजजीवन यांविषयींची संघाच्या सामान्य कार्यकर्त्यांची कल्पना शास्त्रविरुद्ध व अत्यंत संकुचित आहे. संघाची ही मतप्रणाली या देशांत प्रचलित होणें अतिशय धोक्याचें आहे व देशहिताच्या दृष्टीनें तिला पायबंद घालणें सर्वांचें कर्तव्य आहे. पण तें करण्यास संघाची शिस्त व संस्कृति भक्ति यांपेक्षां उच्चतर शिस्त व संस्कृतिप्रेम आपणांत बाणलें पाहिजे. कॉंग्रेसच्या अनुयायांत याचा अभाव दिसतो. म्हणून रा. स्व. संघ व संकुचित वृत्तीचे हिंदुत्वनिष्ठ लोक यांना खरा प्रतिकार त्यांच्या हातून होत नाहीं.

कॉंग्रेसेतर कोणीहि पक्ष सत्ताधारी असता, किंवा झाला तर हे सर्व दोष एकदम जातील असें अर्थात् कोणीहि म्हणणार नाहीं. कॉंग्रेसचे व राज्यकर्त्यांचे दोष हे बव्हंशीं सर्व हिंदी जनतेचे दोष आहेत यांत संशय नाहीं. We get the Government we deserve या न्यायानें एका अर्थी हिंदी जनतेच्याच पसंतीनें आजचे राज्यकर्ते राज्य करीत आहेत. परंतु म्हणूनच त्यांचे दोष व चुका दाखविणें व अवश्य तर वाटेल तेव्हां राजवट बदलणें, हाहि हिंदी जनतेचा हक्क व तिचें कर्तव्य होय.

हिंदी जनतेस हा हक्क नाहीं, असें प्रत्यक्ष कोणी म्हणत नाहीं. परंतु कॉंग्रेसराजवटीचे दोष दाखविलें व निवडणुकींत कॉंग्रेसला आंधळेपणानें मतें












देणें चूक होईल असें सुचविलें कीं जी विचारसरणी मांडली जाते ती मुख्यत: अशी—" कॉँग्रेसी राजवट तितकी यशस्वी झाली नाहीं हें मान्य केलें, तरी तिच्याऐवजीं कोणता पक्ष आपण पसंत करूं शकतों ? कम्यूनिस्ट तर रशियाला विकलेले व देशद्रोही; सोशॅलिस्ट समाजरचना उलथीपालथी करूं इच्छिणारे व अव्यवहारी; हिंदुसभावादी हे जातीय व संकुचित मनोवृत्तीचे; प्रागतिक हे पुस्तकी व निष्क्रिय; कॉँग्रेसच्या शिस्तीमुळें निदान सुव्यवस्था आणि शांतता तरी देशांत दिसते आहे. तीहि जाईल व हलकल्लोळ माजेल, परकीयांना चांगलें फावेल ! " या विचारसरणींत अर्थ आहे व म्हणून प्रथम कॉँग्रेसकडे सत्ता गेली हें ठीक झालें. परंतु अत्युत्तम संधि असूनहि गेल्या तीन वर्षांत ती कॉँग्रेसच्या अनुयायांनीं दवडली व सुखाचें मिळालेलें स्वराज्य चालविण्याची पात्रता दाखविली नाहीं. म्हणून कांहीं झालें तरी आम्ही देशाच्या हिताच्या दृष्टीनें अयशस्वी ठरलेल्या कॉँग्रेसपक्षाला पक्ष म्हणून मतें देणार नाहीं, कोटल्याहि पक्षाची जी व्यक्ति पसंत असेल तिला मतें देऊं, असें म्हणण्याची वेळ आली आहे. शिवाय, देशांतील शांतता प्राय:, हिंदी जनतेच्या सौम्यपणामुळें, ब्रिटिशसत्तेतील व्यवस्था चालू असल्यानें व परकीय संकट न आल्यानें, राहिली आहे; कॉँग्रेसच्या कर्तबगारीनें नव्हे. कॉँग्रेसच्या बाहेर कर्तबगार व्यक्ती नाहींत ही निर्विवाद असत्य गोष्ट आहे. सृष्टीचें रहाटगाडगें फार मोठें आहे. देश हा व्यक्तीपेक्षां व पक्षापेक्षां मोठा आहे. भावनावश न होतां सदसद्बुद्धीस स्मरून कम्यूनिस्टांपासून हिंदुसभेपर्यंत त्यांतील ज्या व्यक्ती पात्र वाटतील त्यांस मतें द्यावीं, कोणी चांगला कॉँग्रेसानुयायी असेल तर त्यासहि त्याच्या वैयक्तिक पात्रतेवर द्यावीं. इतर पक्षांचें कॉँग्रेस करीत असलेलें मूल्यमापन सद्दृद्दर्शनी व विचार न करतां स्वीकारूं नये.

'कॉँग्रेसचें विसर्जन करा' या गांधींच्या संदेशाचें महत्त्व त्यांच्या अनुयायांस समजलें नाहीं, हें देशाचें दुर्दैव होय. गांधीजींच्या नंतर कॉँग्रेसचा लौकिक व नैतिक अधिष्ठान सांभाळणें फक्त पंडित नेहरू यांस शक्य होतें. गांधीजींचें वैशिष्ट्यपूर्ण तत्त्वज्ञान पंडितजींनीं आत्मसात् केलें आहे, किंवा त्यांस तें पूर्णपणें मानवतें असें दिसत नाहीं. तरी पण त्यांच्या निष्ठायुक्त अनुयायित्वाची पुण्याई व सामान्यत: सुसंस्कृत व प्रगतिपर वृत्ति यांचा मिलाफ पंडितजींमध्यें असल्यानें त्यांतल्या त्यांत सामोपचारानें कॉँग्रेसला योग्य वळण लावणें फक्त त्यांनाच शक्य होतें. त्याकरितां पंडित नेहरूंपुढें माझ्या मतें दोन मार्ग होते. देशांतील यच्चयावत् प्रगतिपर व रचनात्मक कार्यकर्त्यांना कॉँग्रेसमध्यें सामील करून घेणें व त्या दृष्टीनें कॉँग्रेसच्या सभासदत्वाच्या अटींमध्यें फेरबदल करणें. दुसरा मार्ग असा कीं, बहुसंख्य किंवा अनेक कॉँग्रेसपक्षीय लोक प्रगतिपरच नव्हेत, तर तितके प्रामाणिकहि नाहींत हें लक्षांत घेऊन स्वत: कॉँग्रेसचा त्याग करणें. तसें नेहरूंनीं केलें असतें, तर त्यांनीं जो पक्ष स्थापला असतां तीच खरी कॉँग्रेस झाली असती व आजच्या कॉँग्रेसपेक्षां तीच अधिक देशहितकार्यक्षम झाली असती. यांतील एकहि उपाय पंडितजींना आजवर साधला व सुचला नाहीं व आतां सुचला तरी यशस्वी होईलसें वाटत नाहीं. ऐतिहासिककारणपरत्वें पक्षाच्या ऱ्हासाचीं जीं गमकें असतात तीं सर्व कॉँग्रेसपक्षाबाबत आज प्रतीत होतात. त्या दृष्टीनें अगदीं अलीकडे झालेली महत्त्वाची घटना म्हणजे श्री. कृपलानी, श्री. प्रकाशम्प्रभृति कॉँग्रेसनेत्यांचा पक्षत्याग. ही घटना अपरिहार्य व स्वागतार्ह वाटते. ते स्थापूं पाहात असलेल्या पक्षाचें भवितव्य आज सांगणें कठिण आहे. तरी पण कॉँग्रेस सोडून जाण्यास लागणारें धैर्य या कॉँग्रेसच्या अनुयायांनीं दाखविलें व खोट्या एकीच्या मोहाला ते बळी पडले नाहींत, ही समाधानाची गोष्ट होय. कॉँग्रेसविरोधी पक्षांस निरनिराळ्या अडचणींतून जावें लागेल. परंतु कांहींतरी सामर्थ्याचा विरोधी पक्ष असण्यानें कॉँग्रेसचीहि कांहीं अंतर्गत सुधारणा होईल असा संभव आहे. हा विरोधी पक्ष देशहितविषयक कांहीं निश्चित कार्यक्रम आंखून त्याच्या अनुरोधानें स्थापन केला गेला तर, कालांतरानें देशांत अराजक न माजतां अधिक कार्यक्षम राजवट आस्तित्वांत येऊं शकेल. प्रागतिक, समाजवादी, आत्यंतिक नसलेले कम्यूनिस्ट व सर्वोदयवादी कॉँग्रेसानुयायी यांतील प्रामाणिक कार्यकर्त्यांस एक सामान्य राष्ट्रहिताचा कार्यक्रम आंखणें अशक्य नाहीं.








# आपल्या देशाची सद्यःस्थिति आणि शिक्षित मध्यमवर्ग

कांग्रेसचे दोष एका अर्थी देशाचे आहेत व ते गेल्याशिवाय स्वराज्य सुराज्य होण्याची आशा नाहीं. शक्य असल्यास कॉंग्रेसराजवट सुधारण्यांत देशाचें हित आहे; कारण, आपल्या दोषांमुळें ती अचानक कोलमडली, तर देशांतील शांतता व सुव्यवस्था यांस धोका आहे. येत्या निवडणुकीच्या वेळीं स्वतंत्र राजकीय पक्ष म्हणून निवडणुकी न लढतां, स्पष्ट व्यवहारी कार्यक्रम पुढें मांडून तो मान्य असेल असा देशांतील सर्वांचा पक्ष कॉंग्रेसनें उभा केल्यास, देशाचें हित व कॉंग्रेस पक्षाचें खरें कल्याण होईल. आजचीं प्रधानमंडळें देशांतील अनेक उत्तम सार्वजनिक व कर्तबगार कार्यकर्त्यांचा उपयोग करूं शकत नाहींत. मुंबई प्रांतापुरतें बोलावयाचें तर श्री. अशोक मेहता, पुरुषोत्तमदास त्रिकमदास, ए. ए. खान, भाई डांगे या व्यक्ती विरोधी पक्षांत असण्यापेक्षां कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांबरोबर सर्वसंमत असा देशहितकारक कार्यक्रम अमलांत आणीत असत्या, तर फार चांगलें झालें असतें. गेल्या १५० वर्षांत येथें परकीय सत्ता असल्यामुळें जबाबदार राज्यकारभाराचा अनुभव आपणांस नाहीं. तरी त्यास लायक असतील अशा सर्व व्यक्ती एकत्र आणून कारभार केल्यास कांहीं तरी यश येईल. मध्यवर्ति प्रधानमंडळांत तसा कांहींसा प्रयत्न झाला आहे. परंतु तेथें आहे त्यापेक्षां अधिक व प्रांतराज्यांतूनहि तो प्रयत्न झाला पाहिजे. गांधीजींशीं केवळ शाब्दिक निष्ठा ठेवून वेळीं-अवेळीं त्यांच्या नांवाचा उपयोग करण्यापेक्षां आपणांस समजेल, पटेल व शक्य असेल असा देशहिताचा स्पष्ट कार्यक्रम पुढें मांडून, घोषवाक्यें विसरून देशांतील सर्व पक्षांच्या कार्यकर्त्यांचा योग्य उपयोग करून घेणें जरूर आहे.

जसजसे दिवस जात आहेत तों तों लहानसहान सुधारणा अमलांत आणून किंवा नेहरू करतात त्याप्रमाणें कॉंग्रेसजनांच्या सदसद्विवेकबुद्धीस आवाहन करून काम भागणार नाहीं, हें स्पष्ट दिसत आहे. त्याचें कारण हेंच आहे कीं, कॉंग्रेस हा केवळ एक लढाऊ पक्ष होता, त्यास राज्यकारभाराचा अनुभव तर नाहींच, पण ती वृत्तीहि नाहीं. गांधीजींचें आध्यात्मिक, नैतिक व रचनात्मक दृष्टिकोनाचें तेजोवलय कॉंग्रेसच्या कार्यांत पूर्वी होतें. तो दृष्टिकोन कॉंग्रेसच्या बहुसंख्य अनुयायांस मान्य नाहीं व समजत नाहीं. आत्मविसर्जन हा एकच उपाय अजूनहि कॉंग्रेसपक्षास तारूं शकेल. तें त्यानें केल्यास स्वातंत्र्यप्राप्तीप्रमाणें स्वातंत्र्यप्रतिष्ठापनेंतहि त्याचें आघाडीचें स्थान कायम राहील. तें त्यानें न केल्यास येणाऱ्या निवडणुकींत मतदारांनीं आपला हक्क समंजसपणें बजवावा व सर्वपक्षीय व खरी प्रागतिक राजवट निर्माण होईल याकरितां प्रयत्न करावा.

वरील विवेचनांत गृहीत धरलेली पार्श्वभूमि व त्यांत अवलंबिलेली पद्धति यांबद्दल शेवटीं दोन शब्द लिहिणें अवश्य आहे. आपल्या देशाला सुमारें दीड शतकाच्या परकीय सत्तेनंतर राजकीय स्वातंत्र्य मिळालें ही घटना कोठल्याहि परिस्थितींत व कोणालाहि स्वागतार्हच वाटते. स्वराज्यामधील जीवनाबद्दल आपल्या ज्या आकांक्षा होत्या त्यांच्या तुलनेनें प्राप्त परिस्थिति पुष्कळशी असमाधानकारक वाटली व स्वराज्यानंतर स्थापन झालेली राजवट अनेक प्रकारें कार्यक्षम नाहीं असें निदर्शनास आलें, तरी त्या अनुभवांत पराभूत वृत्तीची निराशा असण्याचें कारण नाहीं. कितीहि सदोष असलें तरी स्वराज्य हें परराज्यापेक्षां श्रेष्ठच होय. स्वराज्यांत निदान आरंभीं, कदाचित् नेहमींच, एका अर्थी अडचणी अधिक असतात. परंतु त्या सोसण्यानेंच देशांतील व्यक्तिमात्राचें जीवन नंतर समृद्ध होत असतें. प्रस्तुत लेखांत दोषांचा व उणीवांचाच निर्देश असला, तरी त्याचा अर्थ लेखकाच्या मतें कांहींच चांगल्या गोष्टी आज अनुभवास येत नाहींत असा नव्हे. शिवाय, राजवटीचे दोष केवळ एका पक्षाचेच नसून कांहीं प्रमाणांत व अप्रत्यक्षतः सर्व हिंदी जनतेचे आहेत हें विसरून चालणार नाहीं. लेखांतील विवेचन संपूर्ण ( exhaustive ) नसून दिग्दर्शनात्मक ( illustrative ) आहे व त्या-अर्थी तें पूर्ण पद्धतशीर नाहीं, याची लेखकास जाणीव आहे.

---








गरज आहे. हें रंगमंदिर सर्व तऱ्हेच्या आधुनिक उपकरणांनीं सज्ज असावें. रंगभूमिविषयक अत्यंत जरूरीच्या तरी वस्तू तेथें असाव्यात. कोणत्याहि कलाप्रेमी नागरिकांस कलाविषयक निर्मितीकरितां अत्यंत अल्प मोबदल्यांत तें मिळण्याची सोय झाली पाहिजे. नाट्याशीं ज्या कलांचा संबंध येतो त्या सर्व कलांच्या उपासकांस व विद्यार्थ्यांस ही जागा म्हणजे कलेचें एक शुचिर्भूत, निर्मळ मंदिर वाटलें पाहिजे.त्यांत आपल्या मुलांना नाट्याचे प्राथमिक धडे मिळाले पाहिजेत.अशीं नाट्यमंदिरें उभारणें हें, समाजांतील सुधारणेच्या ज्या अनेक चळवळी चालू असतात, शिक्षणाच्या ज्या अनेक संस्था निघतात, त्या चळवळीं-इतकें व संस्थांइतकेंच जबाबदारीचें व महत्त्वाचें आहे, असें समजलें पाहिजे. कलाभिरुचि वाढविणें, तिची जोपासना करणें म्हणजे कांहीं तरी रिकामटेकडेपणा आहे, थिल्लरपणा आहे, असें नसून सुसंस्कृत नागरिकत्वाला अवश्य अशीच ती गोष्ट आहे. कलाभिरुचीचा आपल्यांत किती अभाव आहे, ह्याचा प्रत्यय पाहिजे असेल, तर मोठ्या माणसांचींहि रेडिओवरील भाषणें ऐकावींत, आपलीं तरुण मुलें रस्त्यानें किती गलथानपणें चालतात, वागतात तें पाहावें, आपल्या घरांतील मुलांचें बसणें, बोलणें, वागणें यांचें निरीक्षण करावें आणि आपलीं मुलें मराठी कसें बोलतात व वाचतात हें ऐकावें. सारांश, पुढील पिढीच्या सर्वांगीण वाढीकरितां आपण किती दक्ष आहोंत, याचें निर्विकार मनानें जर आत्म-निरीक्षण केलें, तर प्रथमदर्शनीं चमत्कारिक वाटत असलेल्या कल्पनेची जरूरी आपणांस पटूं लागेल.

वरील तऱ्हेच्या वास्तूच्या निर्मितींत व्यापारी वृत्ति शिरूं न देणें कठिण असलें, तरी तें अत्यंत आवश्यक आहे. एकदां ती वृत्ति शिरली, कीं कलेच्या ध्येयात्मक बैठकीला सुरुंग लागतो. या ध्येयवादी विचारांना एका व्यवहारी मुद्द्यावर आक्षेप घेण्यांत येतो. तो मुद्दा असा कीं, कलेचा व्यापार सुरू केल्याशिवाय कलेला झळाळी, सफाई येत नाहीं. पण दुर्दैवानें मनुष्यस्वभाव असा आहे कीं, झळाळीच्या सबबी-खालीं मनुष्यानें एकदां व्यापार सुरू केला म्हणजे त्यांतील नफ्यावर त्याचें लक्ष इतकें केंद्रित होतें कीं, एका वेळचें कलाप्रेम विसरून बाजारांत खपेल तोच माल निर्माण करण्याकडे त्याची प्रवृत्ति होत जाते, आणि केव्हां गरज म्हणून तर केव्हां पुढील तरतूद म्हणून, बाजाराच्या या दुष्ट चक्रांतून त्याची सुटका मग कधींच होत नाहीं ! तेव्हां या वास्तूचा उपयोग कलेच्या बाजाराला वळण लावण्याचें कामीं फार झालें तर करावा; परंतु आपल्या आवारांत बाजार भरवूं नये किंवा स्वतः व्यापार करूं नये. उलट, कलेचा व्यापार करणाऱ्यांनीं मात्र या प्रयोगशालेला मदत केली पाहिजे. तंत्रविषयक धंदा करणारे लोक शास्त्रीय प्रयोगशालाकडे ज्या दृष्टीनें पाहातात, त्या दृष्टीनें नाट्यव्यवसायिकांनीं या वास्तूकडे पाहिलें पाहिजे.

अशा रीतीनें रंगभूमीची पवित्र वास्तु निर्माण करण्याच्या उद्योगाला या उत्सवांची मदत होईल. आशेची गोष्ट अशी कीं, या उत्सवकर्त्यांच्या मनांत ही वास्तूची कल्पना मूळ धरूं लागली आहे व याच मुख्य कल्पनेनें मुंबईच्या उत्सवकर्त्यांचीं पावलें आज बरेच दिवस पडत आहेत. परवांच्या पुण्याच्या उत्सवानें तेथेंहि या कार्यास चालना मिळाली आहे. नागपूर, सांगली येथेंहि यासंबंधीं प्रयत्न चालू आहेत. वास्तूची ही कल्पना साकार झाल्यावर—नव्हे साकार होत असतांनाच, वर उल्लेखिलेला व्यापारी धोका सतत मनांत ठेवणें जरूर आहे. नाहीं तर कै. अण्णासाहेब किर्लोस्करांच्या स्मारकाप्रीत्यर्थ बांधलेल्या किर्लोस्कर-नाटकगृहासारखी अवस्था होईल. आज किर्लोस्कर-नाटकगृह हें नांवहि राहिलें नाहीं.

## नाटककार, नट आणि नाट्यव्यवसायी

अशा रीतीनें वास्तूचा,रंगमंदिराचा प्रश्न आपल्या मनाप्रमाणें सुटला असें गृहीत धरलें, तरीहि रंग-भूमीच्या उन्नतीच्या आड येणारे सर्व प्रश्न सुटले असें होत नाहीं. ज्या रंगभूमीच्या वैभवकालाची आपण आठवण करतों, त्याचीं गोड स्मृतिचित्रें नजरेसमोर खेळवितों, त्या वैभवाचे घटक म्हणजे त्या वेळचे नाटककार, नट आणि नाट्यव्यवसाय चालविण्यास त्या वेळीं अनुकूल असलेली आर्थिक परिस्थिति. ह्यांपैकीं तिसऱ्या गोष्टीचा प्रथम विचार करूं. त्या वैभवाच्या काळीं जें जीवनस्वास्थ्य होतें, तें मिळविण्याकरितां आज किती तरी अधिक कष्ट करावे लागत आहेत. एकंदर सामाजिक मनाचा










विचार करतां, कुठूनहि व कसाहि पैसा मिळविणें ही एकच गोष्ट महत्त्वाची होऊन बसली आहे. पैसा मिळविणें ह्या एवढ्या एकाच ध्येयाची चटक लागल्यावर, करीत असलेल्या व्यवसायाचें स्वरूप, विशेषतः व्यापारविषयक व्यवसायाचें स्वरूप, किती निकृष्ट अवस्थेला पोहोंचेल, याला सुमार राहत नाहीं. बाजारी, तकलादू, भ्रमोत्पादक माल किंवा कल्पना पसरविण्याकडेच मनाची प्रवृत्ति होते. आजकाल सर्व क्षेत्रांत असलेली ही स्थिति नाट्यव्यवसाय करणाऱ्या लोकांची पण झाली आहे.

दुसरी महत्त्वाची बाब म्हणजे नाटककार. अंतःकरण ढवळून निघेल असें नाटक लिहिलें जाण्यास लेखकास एक उत्तम स्वास्थ्य तरी असावें लागतें किंवा भयंकर चीड येऊन पोटतिडीक उत्पन्न व्हावी लागते. आज यांपैकीं एकहि नाहीं. वर लिहिल्या-प्रमाणें कसाहि पैसा मिळविणे ही एकच गोष्ट महत्त्वाची होऊन बसली आहे. ध्येयनिष्ठेच्या गोष्टी बोलणेंहि हास्यास्पद ठरत आहे. एका घरांतच अठरा मतें; 'आठ भय्ये व नऊ चुली'! व्यक्ति-स्वातंत्र्याचें व व्यक्तिसुखवादाचें माजलेलें फाजील स्तोम! शिकवायला सगळे तयार; शिकायला कोणीच नाहीं. आदर व अनादर यांच्या सीमारेषा अत्यंत पुसट झालेल्या. निष्ठेच्या अभावीं विचारी व अविचारी सर्वच आपआपल्यापरी अस्वस्थ. आणि या अस्वस्थतेवर विनोदाची फुंकर मारणें हाच खरा उपाय, असें कांहीं लेखक समजत आहेत. तर कांहीं जण मनोविश्लेषणाच्या नांवानें गुंगी आणणारीं औषधें सुचवीत आहेत. अशा स्थितींत द्रष्टा नाटककार निघण्याची आशा कितीशी आहे? मौलिक नाटकांची निपज अत्यंत कमी असून विचार व तंत्र या दोन्ही बाबतींत आम्ही पश्चिमेकडून उधार-उसनवारी करीत आहोंत. अशा दत्तक घेतलेल्या गोष्टींत सामान्य जनतेला आपलेपणा वाटला नाहीं तर नवल नाहीं. उलट, रसिक शिक्षितांनाहि त्यांत नावीन्य वाटत असलें, तरी त्या आपल्याशा वाटत नाहींत. देशांतील आर्थिक स्थिति व स्पर्धा यांचा परिणाम नवोदित लेखकांवर तर लगेच झाल्या-वांचून राहत नाहीं. आणि खरेंच आहे. आपल्या विचारांच्या व भावनांच्या प्रकटीकरणाला जास्तींत जास्त पैसा तावडतोब मिळवून देईल, असें माध्यम लेखकानें निवडलें तर त्याला तरी दोष कसा द्यावा?

जी स्थिति नाट्यकुशल लेखकांची तीच नटांचीहि आहे. रंगभूमीचे हे दोन घटक म्हणजे नाट्यव्यवसायाचा कच्चा माल होत, परंतु हाच कच्चा माल सिनेमालाहि लागत असल्यामुळें व सिने-व्यापार हा उदंड भांडवलाचा व 'स्पेक्युलेटिव्ह' धंदा असल्यामुळें तो धंदा, पडेल ती किंमत देऊन, रंगभूमीला 'कॉर्नर' करीत अ९तो. त्यामुळें या क्षेत्रांतील पहिल्या प्रतीचा माल ९हजासहजीं किंवा स्पर्धेत रंगभूमीच्या वांट्यास येईल असें वाटत नाहीं. तेव्हां अशा परिस्थितींत रंगभूमीचा जीवनरस आटत गेला असल्यास नवल काय?

नाट्यकलेच्या व्यवसायाची आज ही अशी स्थिति आहे आणि ती अशीच बराच काल राहील असें दिसत आहे, म्हणून आपण हात जोडून स्वस्थ न बसतां घरांतील एकच एक कर्ता पुरुष गेला म्हणजे लहान लहान मुलांबाळांचा संसार सुजाण गृहिणी ज्या दक्षतेनें व झुंजार वृत्तीनें चालवून पुन्हां पहिला वैभवाचा काल पाहते, त्या वृत्तीनें नाट्य-कलेकडे आज समाजानें पाहिलें पाहिजे.

## नाट्योत्सवाची विधायक बाजू

गेल्या सात-आठ वर्षांतील नाट्यमहोत्सवांच्या चालकांसमोर या गोष्टी विचाराकरितां नाहींत असें नाहीं. मुंबईचा नाट्यमहोत्सव करणाऱ्या साहित्यसंघानें वास्तु, नाटककार व नवे नट या तिन्ही बाबतींत, अल्प का होईना, मार्गक्रमण केलें आहे. महाराष्ट्रांत इतर ठिकाणीं ही जागृति विचाराच्या क्षेत्रांत असली तरी ती कार्याच्या क्षेत्रांत अजून चांगलीशी सुरू झालेली दिसून येत नाहीं. ठिकठिकाणच्या नाट्योत्सवांच्या कार्यकर्त्यांना नांवें ठेवण्यांत येतात कीं, हे लोक जुन्या वस्तूंचा बाजार भरवून लोकां-कडून द्रव्य उकळतात! वादच करावयाचा झाला तर या टीकाकारांना असें विचारतां येईल कीं, नव्या वस्तूंचा बाजार भरविण्यास तुम्हाला नको कोणी म्हटलें आहे? परंतु वाद घालणें हा या लेखाचा हेतु नाहीं. टीकाकारांनीं अधीर न होतां उलट सहानु-भूतीनेंच या विषयांत मार्गदर्शन करावयास पाहिजे. पूर्वसंस्कारांनीं युक्त अशी समाजांतील कोणतीहि










संस्था सहजासहजीं बदलली जात नाहीं किंवा जादू करून त्या जागीं एकदम नवीन आणतांहि येत नाहीं. जुन्या बाजारावर जगण्याची वेळ येणें खरो-खरच वाईट. परंतु जनमनांतील जुना वाडा पाडणेंहि तितकेंच मुष्किलीचें असतें. मग तेथें नवें घर उभा-रणें किती जिकिरीचें असेल याची कल्पना करावी. खरा मुद्दा एवढाच कीं, नवीन अंकुरांचीं चिन्हें जर दिसत असतील, तर मूळच्या जुन्या फांद्यांचा व पान-पाचोळ्याचा राब वृक्षाच्या बुंध्याला अवश्य घालावा.

या उत्सवांतून सिनेमांतील नटनटींचा उपयोग करण्यांत येतो म्हणूनहि कोणी नांवें ठेवतात. इतके दिवस हे सिनेमा-नटनटी बेफिकीर मस्तवाल आहेत. म्हणून त्यांना नांवें ठेवीत असत ! आज त्यांतील कांहीं व्यक्ती निव्वळ प्रेमानें रंगभूमीला सन्मुख आल्या असतां व कार्यकर्ते त्यांचा योग्य उपयोग करून घेत असतां त्यांना नांवें कां ठेवावींत ? परवां एके ठिकाणीं 'हौशी नटा'ची व्याख्या करतांना सिनेमाधंदेवाईकांना तांत्रिक दृष्ट्या अस्पृश्य समज-ण्यांत आलें हेंहि योग्य नव्हे.

रंगभूमि हें जीवनाचें एक महत्त्वाचें अंग आहे. जीवनांत अनुभविलेल्या, दिसलेल्या, भासलेल्या भावनांचा पुनःप्रत्यय घेण्यासाठींच रंगभूमीचा अवतार आहे आणि म्हणूनच रंगभूमीला जीवनाचें प्रतिबिंब असें म्हणतात. उलट, भावी जीवन हें आजच्या रंगभूमीचें प्रतिबिंब असणार असेंहि म्हणा-वयास प्रत्यवाय नाहीं. कारण रंगभूमीवर आम्ही कशाचीं चित्रें नाचवतों ? पूर्वजांच्या पराक्रमाचा आम्ही अभिमान बाळगतों, त्यांनीं केलेल्या किंवा आम्हांस आज वाटत असलेल्या चुका आजच्या जीवनांत टाळायचा प्रयत्न करतों, स्वार्थत्यागपूर्वक आमच्या भावी पिढ्यांच्या कल्याणार्थ सांस्कृतिक वारसा निर्माण करून ठेवण्याच्या खटपटींत असतों. आणि जीवनपूर्तीचीं कल्पनामय क्षितिजें निर्माण करून ठेवतों. तेव्हां रंगभूमि हें जीवनाचें एक महत्त्वाचें अंग आहे असा विचार व प्रयत्न करणाऱ्या समाजांतील सर्व कार्यकर्त्यांनीं हाताशीं असलेल्या व चालून येत असलेल्या सर्व साधनांचा उपयोग करून घेतला पाहिजे. ज्यांनीं रंगभूमीकडे पाठ फिरविली असेल त्यांना गोंजारून सन्मुख केलें पाहिजे.

## अनिकेत रंगभूमि आनंदनिकेतन झाली पाहिजे

रंगभूमीविषयीं निष्ठा बाळगणाऱ्या सर्व नागरिकां-ना एकत्र येतां यावें, नाटककार, नट व विद्वान् रसिक या सर्वांना आर्थिक विवंचना फारशी न करतां फावल्या वेळांतील आपल्या बौद्धिक, मान-सिक व शारिरिक कष्टांची सेवा रंगभूमीच्या चरणीं रुजूं करतां यावी म्हणूनच नाट्यप्रयोगशाले-सारख्या वास्तूची आज अत्यंत जरूर आहे. समा-जांतील संवेदनाशील व्यक्तींच्या आत्मप्रकटीकरणाला अशा रीतीनें जागा निर्माण करून देणें हें समाज-स्वास्थ्याच्या दृष्टीनें राज्यकर्त्यांचेंहि कर्तव्य आहे. खिशाला फारशी तोशीस लागत नाहीं अशी खात्री वाटूं लागली कीं, या प्रयोगशालेचा उप-योग करूं पाहाण्यास पुष्कळ जिज्ञासू तयार होतील. या प्रयोगशालेंतील प्रयोगाचें कार्य जीवनाभिरुचि शुद्धतर होण्यांत होत आहे अशी खात्री झाली (मग तें कार्य कितीहि मंद किंवा प्रथमावस्थेंत होत राहिलेलें असो), म्हणजे निराश होण्याचें कारण नाहीं. रंगभूमीचा तो वैभवकाल दाखविण्याकरितां आकाशांतून कोणी देवदूत उतरेल किंवा भूमींतून कोणी धंदेवाईक अकस्मात् उत्पन्न होईल अशी आशा न करतां, रसिकांनीं, व कलानिर्मितीचीं स्वप्नें ज्यांना बेचैन करीत आहेत अशा स्वप्नाळू लोकांनीं, जर दृढ श्रद्धेनें प्रयत्न केले तर, आपली रंगभूमि आजच्या संसाराच्या तापत्रयांतहि आनंदनिकेतन ठरेल यांत शंका नाहीं.

---

"थोड्या दिवसांपूर्वी, पुणें येथें झालेल्या आपल्या षष्ठ्यब्दपूर्तिसमारंभाचे प्रसंगीं, नटवर्य श्री. केशव-राव दाते यांनीं मराठी रंगभूमीच्या प्रेक्षकांबद्दल कळवळ्यानें गौरवाचे उद्गार काढले...ते म्हणाले कीं, "प्रेक्षकवर्गाचें मराठी रंगभूमीवर, मैत्रेयाचें चारुदत्तावर होतें, तसें अतूट प्रेम आहे." श्री. दाते यांचे शब्द अक्षरशः खरे आहेत. आणि याच आधारावर नवी मराठी रंगभूमि उभी राहील असा मला विश्वास वाटतो."

—श्री. के. नारायण काळे, मुंबई-मराठी, नाट्योत्सवाच्या अध्यक्षीय भाषणांतून, 'साहित्य', जून १९५१



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



## सारसंकलन

### महाराष्ट्रासंबंधीं विनोबांची दृष्टि

गेल्या एप्रिलमध्यें सर्वोदयसंमेलनप्रसंगीं श्री. विनोबांनीं महाराष्ट्रीय कार्यकर्त्यांना उद्देशून जे विचार प्रकट केले ते फार महत्त्वाचे आहेत. इतर प्रांतांच्या तुलनेनें महाराष्ट्राकडे ते कमी लक्ष देतात असा विनोबांबद्दल एक समज आहे. त्याचें स्पष्टीकरण करून विनोबांनीं सांगितलें—

" मीं जें कांहीं चिंतन-मनपूर्वक लिहिलें आहे आणि आजहि लिहीत असतों, तें सर्व मीं मराठींत लिहिलें आहे व लिहीत आहें. एवढ्यानें मीं आपलें कर्तव्य केलें असें मी समजतों. हा पक्षपात मी जाणूनबुजून करतों असें नाहीं. मराठीचा मी जितका अभ्यास केला आहे तितका एक संस्कृत सोडून दुसऱ्या कोठल्याहि भाषेचा केलेला नाहीं. मला विचार मराठींत सुचतात. त्याच भाषेच्या आधारानें मी चिंतन करतों. मनुष्याचें सारें हृदय त्याच्या चिंतनमय लेखांत व्यक्त होत असतें. अशा प्रकारें माझें हृदय मराठींतूनच व्यक्त होतें. एवढ्यानें माझें कर्तव्य पुरें होतें कीं नाहीं, तें आपणच ठरवावें. त्याशिवाय मागील तीस वर्षांत माझें कार्य-क्षेत्र मराठी प्रदेशांतच होतें ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. हें क्षेत्र मीं बुद्धिपूर्वक निवडलें नाहीं, तें सहजगत्या प्राप्त झालेलें आहे.

" महाराष्ट्रांतील लोकांना एकमेकांच्याबद्दल प्रेम व अभिमान बाळगावयाचा असेल तर, एकमेकांच्या दोषांची जिम्मेदारीहि त्यांनीं पत्करली पाहिजे. आमच्याबद्दल इतर प्रांतांतील लोकांत कांहीं गैर-समज आहेत आणि कांहीं दोषांचा आरोपहि आमच्यावर केला जातो. त्यांपैकीं कांहीं दोष चुकीनें आमच्यावर लादले गेले असण्याचा संभव आहे. परंतु आमच्या ज्या कांहीं दोषांची जाणीव बाहेरच्या लोकांना आहे त्या दोषांबद्दल त्यांच्याहून अधिक जाणीव वस्तुतः आपणांलाच असली पाहिजे. एकंदरीनें भारतीय लोक मोठे क्षमाशील व दोष-विस्मरणशील आहेत. ही दोषविस्मरणशीलता जर आमच्या ठिकाणीं नसती तर, येशू ख्रिस्ताच्या हत्येचें पाप जसें दोन हजार वर्षांनंतर अजूनहि यूरोपांत सलत आहे, तसें गांधीहत्येचें पापहि इतर प्रांतीयांच्या मनांत सलत राहिलें असतें. पण गांधीहत्या-विषयक क्रोध दिवसेंदिवस कमी होत असलेला दिसत आहे आणि कांहीं काळानंतर लोक तो विसरूनहि जातील व म्हणतील, ' गांधींचा खून करणारा कोणी वेडा होता झालें.... ! '

" गेल्या तीनचारशें वर्षांत महाराष्ट्रांतील सामान्य जनता वगळून बाकी सर्वांना स्थूल विचार करण्याची संवय लागली आहे. सूक्ष्माचा विचार सोडून स्थूलाचा विचार करणें म्हणजे मूळ सोडून खोडाचा विचार करण्यासारखेंच आहे. म्हणूनच तो सम्यक् विचार असत नाहीं. ज्ञानेश्वरीची गंभीरता आम्हांला आठवत नाहीं. इतक्या खोलींत शिरल्यावर आम्ही निष्क्रिय बनूं, अशी भीति आम्हांस वाटते. त्यामुळें पाश्चात्यांच्या उथळपणाचें अनुकरण करण्याकडे आमचा कल वाढत आहे.

" आमच्याकडे ' आमची संस्कृति ' म्हणत असतांनाहि मध्यमवर्गाला पेशवाईची जितकी आठवण होते तितकी ज्ञानेश्वर-एकनाथांचीहि येत नाहीं. जे लोक म्हणतात कीं, अहिंसा आमच्या रक्तांत नाहीं, त्यांना आपल्या पूर्वजांची ओळख पटलेली नाहीं... ज्ञानेश्वरींत एकहि कटु शब्द शोधून सांपडत नाहीं. अहिंसेचे उत्तम आचार्य जे महात्मा गांधी व टॉलस्टॉय यांच्या लेखांतहि अनेक कटु शब्द आढळतात. येशूनें आपल्याला पीडा करणाऱ्यांची तीव्र शब्दांत निंदा केली आहे. पण ज्ञानेश्वरांच्या साहित्यांत एकहि कटु शब्द नाहीं.

म्हणूनच महाराष्ट्राच्या जनतेला अहिंसेची बाळगोळी ख्रिस्ती लोकांपेक्षांहि अधिक प्रमाणांत पाजली गेली आहे असें मी म्हणतों. याप्रमाणेंच सत्याग्रहाचें एक उत्तम उदाहरण एकनाथांनीं आपल्या जीवनांत घालून दिलें आहे. अशा प्रकारें सत्य व अहिंसा हीं दोन्ही तत्त्वें आम्हांला नवीं नाहींत. महाराष्ट्रीय संतांनीं आम्हांला पहिल्यापासूनच तीं शिकविलीं आहेत. ''

## 'दलितसेवका 'च्या हरिजनसेवेची भूमिका

महाराष्ट्रांतील प्रमुख समाजसेवकांत महाराष्ट्र प्रांतिक हरिजन-सेवक-संघाचे अध्यक्ष व दलितसेवा-क्षेत्रांतील एक प्रमुख कार्यकर्ते श्री. वि. न. ऊर्फ काकासाहेब बर्वे यांची गणना होते. हरिजनकार्याच्या वाढीसाठीं त्यांनीं आपल्या संस्थेतर्फे 'दलितसेवक' नांवाचें मासिक ( व हल्लीं पाक्षिक ) सुरू केलें व त्यांतून निःपक्षपाती, बुद्धिवादी आणि मानवहितैषी दृष्टीनें लेख लिहून मतप्रसार केला. त्या नियत-कालिकानें नुकतींच दहा वर्षें पुरीं केलीं. त्या निमित्तानें ता. १ जूनला एक छोटासा विशेषांकहि प्रसिद्ध झाला आहे. श्री. काकासाहेब बर्वे यांनीं त्यांतील आपल्या लेखांत 'दलित-सेवे 'ची भूमिका स्पष्ट केली आहे. श्री. काकासाहेब बर्वे यांच्या सेवाकार्यामागील ही भूमिका सर्वांनाच महत्त्वाची वाटणारी असल्या-मुळें त्यांतील कांहीं भाग पुढें उद्धृत केला आहे :

" जातीय दृष्टीनें हिंदुस्थानांत जो दलितवर्ग आहे, त्याची सेवा करावयाची म्हणजे, माणूस या नात्यानें त्याची सर्वांगीण उन्नति करावयाची आहे; म्हणजेच समाजांत त्याला मानाचें स्थान व नागरिक हक्कांचा अविरोध उपभोग, उद्योगधंदा करून सामान्यपणें सुखानें राहतां येण्यासाठीं हवा तो धंदा करण्याची मोकळीक आणि तो करण्यासाठीं लाग-णाऱ्या साधनांची तरतूद व साहाय्य, तसेंच सर्व सुधारलेल्या व सुसंस्कृत जीवनासाठीं आवश्यक असलेलें शिक्षण घेतां यावें यासाठीं खास सवलती व मदत, आणि या सर्व बाबतींत पुढें जात अस-तांना येणारे अडथळे व अडचणी दूर करण्यासाठीं लागणारी खास मदत, हें या सेवेचें सामान्य स्वरूप आहे. याचाच अर्थ दलितसमाजांतील लोकांची सर्वांगीण उन्नति करून त्यांना माणूस या नात्यानें पूर्ण दर्जा प्राप्त करून देणें हेंच दलित-सेवेचें ध्येय असलें पाहिजे. श्री. अप्पासाहेब पटवर्धन यांनीं वापरलेल्या सुंदर शब्दाचा उपयोग करून मी म्हणतों कीं, 'मानवतेची प्रतिष्ठा ' हें भारतांतील दलित-सेवेचें ध्येय असलें पाहिजे.

''मानवतेची प्रतिष्ठा अथवा विकास हें जर भारतां-तील दलित-सेवेचें ध्येय मानलें, तर मानवतेच्या शुद्ध भूमिकेवरून केलेली सेवा हीच अधिकांत अधिक निरपेक्ष व शुद्ध सेवा होऊं शकेल, असें वाटतें. मानवतेची उपासना म्हणजेच मानवधर्म अथवा माणुसकी होय. इतर कोणत्याहि प्राण्याच्या ठिकाणीं सांपडणार नाहीं, अशा प्रकारची बौद्धिक आणि आध्यात्मिक शक्ति माणसाच्या ठिकाणीं आहे. या शक्तीच्या विकासाला खूप अवकाश आहे. निदान आज तरी तिची परिसीमा गांठली गेलेली नाहीं. सर्व मानवजात ही मूलतः एकाच प्राणिशाखेंतील ( Species ) आहे. मानवांतील निरनिराळे वर्ण, वंश आणि जाती या, लक्षावधि वर्षांच्या जीवन-कलहाच्या इतिहासांतून भिन्न-भिन्न हवा, पाणी, अन्न आणि आजूबाजूची परिस्थिति यांमुळें बनल्या आहेत. पण या सर्वांपेक्षां मनुष्यत्व मोठें आहे. शेंकडों वर्षें सामाजिक अवहेलना, दारिद्र्य व अज्ञान यांत खितपत पडलेल्या महार जातींत चोखामेळा यांच्यासारखा संत व डॉ. आंबेडकर यांच्यासारखा विद्वान् पुरुष निपजला, ही एकच गोष्ट मनुष्यजातीच्या ठिकाणीं असलेल्या सुप्त शक्तीची निदर्शक आहे. साधुसंतांनाहि मानवदेहाची थोरवी पूर्णपणें मान्य आहे. समर्थ रामदास यांनीं म्हटल्याप्रमाणें ' धन्य धन्य हा नरदेहो, येथील अपूर्वता पहा हो, जो जो कीजे परमार्थलाहो, तो तो पावे सिद्धीतें. ' या ठिकाणीं परमार्थ म्हणजे कोणताहि श्रेष्ठ पुरुषार्थ हा अर्थ घ्यावा. या दृष्टीनें पाहतां सर्व मानवांच्या विकासाला ज्यायोगें पूर्ण वाव मिळेल व तो घड-वून आणण्याला मदत होईल असा मानव-धर्म ज्या-योगें सिद्ध होईल, तोच मार्ग आपणांस हवा. व त्याच भूमिकेवरून केलेली सेवा ही निर्दोष व अधिक फलदायी होईल. मानवधर्म म्हणजेच 'सर्वोदय ' असें मला वाटतें. आज ती दलित-सेवा विविध स्वरूपांत चालू आहे, ती बऱ्याच










अंशीं विशिष्ट धर्मांच्या अभिमानानें अथवा धर्मांच्या भूमिकेवरून चालू आहे. यामुळें ती अपुरी व सदोष आहे असें मला वाटतें."

स्वर्गवासी वामनराव मुकादम

महात्माजींच्या हिंदुस्थानांतील कार्याच्या आरंभीं जी कांहीं थोडी महाराष्ट्रीय मंडळी त्यांच्याकडे आकृष्ट झाली, त्यांत श्री. मामा फडके आणि स्व. वामनराव मुकादम यांची गणना होते. श्री. वामनराव मुकादम यांना कांहीं महिन्यांपूर्वी देवाज्ञा झाली. श्री. वामनराव मुकादम यांचें कायदेमंडळांतील कार्य प्रसिद्धच आहे. त्यांनीं शिवाजीचें एक विस्तृत चरित्रहि गुजरातींत लिहून प्रसिद्ध केलें असून, तें गुजरातींत अधिकृत मानलें जातें. श्री. मुकादम यांच्याविषयीं एक लहानसा लेख श्री. मामा फडके यांनीं 'शिक्षण अने साहित्य' मासिकाच्या एप्रिलच्या अंकांत दिला आहे. त्यांतील महत्त्वाचा भाग पुढें दिला आहे :

" वामनरावांचें कार्यक्षेत्र पंचमहाल जिल्हा आणि गुजरात एवढेंच, फार तर मुंबई राज्याएवढें होतें ही गोष्ट खरी. पण त्यांची हिंमत, केवढयाहि मोठ्या शिलेदाराला खडा सवाल टाकणारा त्यांचा स्पष्टवक्तेपणा, त्यांचा निःस्पृहीपणा वगैरे गुण त्यांना अखिलभारतीय नेतृत्वाला योग्य बनवतील असे होते. पस्तीस वर्षें अखंड सेवा करीत असतांहि ज्यांनीं आपल्या घरीं अनीतीचा किंवा भेट मिळविलेला एकहि पैसा ठेवला नाहीं असे सार्वजनिक सेवक किती असतील ?

" वामनरावांनीं सेवाकार्याची सुरुवात १९०५ च्या काळांत केली. शिक्षण जेमतेम पांचव्या इयत्तेपर्यंतच झालेलें असूनहि त्यांच्या अंगची कुशाग्रबुद्धि, मूलग्राही बुद्धिमत्ता, हजरजबाबीपणा आणि कोणताहि प्रश्न हातीं घेतला असतां त्याचा तपशीलवार अभ्यास करण्याची संवय वगैरे गुणांमुळें गांधीजीहि त्यांना पुष्कळ वर्षें वकीलच समजत. वामनरावांचें वक्तृत्व भाषेच्या दृष्टीनें साधें पण म्हणी व गांवठी उपमा यांनीं भरलेलें आणि बाबरटाच्या अंगावरहि त्वेषानें कांटा उभा करील असें होतें. १९३०-३१ सालच्या मिठाच्या सत्याग्रहांत धारासणा मुक्कामीं जात असतां वाटेंत बडोदा व बलसाड येथें त्यांनीं दिलेलीं भाषणें गुजरातेंतील लोक अजूनहि विसरले नसतील.

" सन १९१५-१७ सालीं गुजरात-काठेवाडांतील वेठीची प्रथा समूळ उखडून टाकण्यासाठीं त्यांनीं जे अपार श्रम केले, आणि त्यांत जें बरेचसें यश मिळविलें तें आजहि गुजरातचे कार्यकर्ते आणि जनता आठवीत असतात. हें त्यांच्या जीवनांतील पहिलें आणि फार मोठें सार्वजनिक कार्य होतें.

" वामनराव हे टिळकांच्या विचारसरणीचे आणि कार्यपद्धतीचे अनुयायी होते. इंग्रजी सरकारला विरोध करण्यापलीकडे दुसरें कोणतेंहि नित्याचें भरीव विधायक कार्य करण्याकडे त्यांनीं अनेक वर्षें लक्ष दिलें नाहीं; आणि म्हणूनच पंचमहाल जिल्ह्यांतीलच नव्हे तर गुजरातेंतील युवकांना संघटित करण्याइतकें सामर्थ्य असूनहि त्यांना कार्यकर्त्यांचा नवा संच तयार करतां आला नाहीं, आणि पंचमहाललाहि त्यांच्या शक्तीचा पूर्ण फायदा मिळूं शकला नाहीं. ते जसे विरोधकांचे कट्टे दुष्मन् होते तसेच गरीबांचे जिवाभावाचे मित्र आणि वाली होते. ते हिंदुमहासभेच्या वृत्तीचे होते असें पुष्कळ लोक समजतात, पण तें तितकेंसें खरें नाहीं. हिंदूंच्या हाडांत खिळून बसलेला भित्रेपणा त्यांना सहन होत नव्हता, आणि म्हणूनच स्वातंत्र्य मिळाल्यावर जीवनाच्या संध्याकाळीं होमगार्ड्सचें काम त्यांनीं पूर्ण उत्साहानें हातीं घेतलें होतें.

" घरीं सुदामदेवाचें दारिद्र्य असूनहि वामनरावांचें घर अतिथींला सदां उघडें असे. कोणत्याहि पक्षाचा कार्यकर्ता गोध्राशहरीं आला तर बहुधा तो वामनरावांचाच पाहुणा बने, मग वामनराव घरीं असोत किंवा नसोत. कोणी पुढारी गोध्रामुक्कामीं आल्यावर वामनराव आपल्या सांपत्तिक स्थितीचा विचार न करतां खर्च करीत हें पाहून त्यांना माझ्यासारख्या माणसानें उधळेपणा म्हटलें तर काय नवल ! सार्वजनिक सेवेच्या धुनींत त्यांनीं स्वतःच्या कुटुंबियांकडे केलेलें दुर्लक्ष गृहस्थाश्रमी माणसाच्या बाबतींत तरी गुन्हाच मानलें जावें अशा प्रकारचें होतें.

" वामनराव पंचमहाल जिल्ह्याचें आच्छादन, शिरश्छत्र होतें. इतर ठिकाणांप्रमाणेंच पंचमहालमध्येंहि घुसूं पाहणाऱ्या नव्या नव्या वादांचें आणि संधि-







साधूंचें त्यांनीं कांहीं चालूं दिलें नाहीं. त्यांच्या निधनानें पंचमहालचें हें छत्र नाहींसें झालें आहे व आज पंचमहाल उघडा पडला आहे ! ''

## इराणांतील तेलसंघर्षाची पार्श्वभूमि

इराणमधील तेल-धंद्याच्या राष्ट्रीयीकरणाच्या प्रश्नानें उग्र स्वरूप धारण केलें असून या ' स्नेह '-मूलक संघर्षानें आंतरराष्ट्रीय राजकारणास रंग चढणार अशीं लक्षणें दिसत आहेत. इराणच्या या तेल-धंद्याच्या राष्ट्रीयीकरणाबद्दलच्या आग्रहामागें कोणती राजकीय आणि आर्थिक पार्श्वभूमि आहे, तें पाहणें अनेक दृष्टींनीं उद्बोधक ठरेल. ' टाइम्स ऑफ इन्डिया ' चे खास बातमीदार डोनाल्ड एफ्. टॉमस यांनीं त्या पत्रांत नुकतीच एक लेखमाला लिहून या प्रकरणामागील पार्श्वभूमीवर प्रकाश टाकला आहे. त्या लेखमालेचा सारांश असा :

'' इराणच्या या राष्ट्रीयीकरणाच्या बुडाशीं खोल राजकीय आणि धार्मिक कारणें आहेत. उगवता राष्ट्रवाद आणि धार्मिक जीर्णोद्धारवाद यांची युति होऊन एका लहानशा पक्षाच्या हातीं सर्व सत्ता आली आहे आणि इराणी राष्ट्राच्या कक्षेंतून पाश्चात्य हितसंबंधच नव्हेत तर, सर्व तऱ्हेचा पाश्चात्य संबंध हुसकून लावण्यासाठीं तो बद्धपरिकर झाला आहे. सनातनी, साम्यवादी, राष्ट्रवादी आणि अराजकवादी या सर्वांनीं या बाबतींत एकजूट केली आहे.

'' युद्धानंतर सत्ता राजमहालांतील गटांच्या, जमातींच्या, जमीनदारवर्गाच्या आणि सट्टेबाज व्यापाऱ्यांच्या हातीं आली. जी कांहीं थोडी सनदशीर एकरूपता आणि सार्वजनिक व व्यापारी नीति पूर्वी होती तीहि नष्ट झाली आहे. अधिकारी आणि पक्षपात हीं पैशानें वळतात व मिळतात असें सर्वत्र मानलें जातें. देशाची अर्थ-व्यवस्था अत्यंत हलाखीची आहे.

'' गेल्या दहा वर्षांत असें दिसलें कीं, शेती-विषयक आणि ग्रामीण अर्थव्यवस्था कमजोर बनली आहे आणि यावर अवलंबून राहणारे कोट्यवधि लोक भांबावून गेले आहेत. त्यांची आर्थिक स्थिति खालावत चालली आहे; कारण अन्नधान्याच्या, वस्त्रप्रावरणाच्या व इतर गरजेच्या वस्तूंच्या किंमती सारख्या वाढत आहेत.

'' शहरांत राहणाऱ्या ३० लाख लोकांनीं बिनशर्तपणें वरच्या वजनदार कंपूशीं संगनमत केलेलें आहे. हा शहरी वर्ग वरच्या व खालच्या थरांतील लोकांचा बनलेला असून, त्याला त्या कारणामुळेंच ' इंद्रधनुष्यासारखा वर्ग ' असें नांव मिळालें आहे.

'' भौतिक जीवनासाठीं लोकांजवळून भरपूर काम करून घेऊनहि त्यांना शांतता, सुरक्षितता किंवा श्रमाचा योग्य मोबदला यांपैकीं कांहीं दिलें जात नसल्यामुळें आम जनतेचा कल हळूहळू कट्टर धार्मिक किंवा राजकीय पंथाकडे वळत चालला आहे. लोक जसे कट्टर धर्मनिष्ठ पक्षांत सामील झाले तसेच ते कट्टर साम्यवादी पक्षांतहि मिळाले; एवढेंच नव्हे तर अराजकवादीहि बनले. या क्षणाला इराणच्या जीवनप्रवाहांत मध्यममार्गाला स्थान राहिलें नाहींसें दिसतें.

वरिष्ठ वर्गाच्या तेलविषयक राष्ट्रीयीकरणाच्या मोहिमेला सर्वांचा पाठिंबा मिळतो याचें कारण दुहेरी आहे. ( १ ) परकीय सत्तेचा घृणास्पद हस्तक्षेप दूर करणें आणि ( २ ) इराणची स्थिरता आणि सामर्थ्य व स्वावलंबित्व प्राप्त करण्यासाठीं तेलांतून होणाऱ्या उत्पन्नाचा झरा राष्ट्राच्या तिजोरीकडे वळवणें— यांबाबत सर्व राष्ट्राचें एकमत आहे.

'' आजचा सत्ताधारी पक्ष ' नॅशनल फ्रंट ' होय. तो अनेक लहान लहान कंपूंचा बनलेला आहे. ' तुदे ' पक्ष हा साम्यवादी कट्टर ' लोक '-पक्ष होता, पण तो आतां बेकायदा ठरविलेला आहे. तिसरा पक्ष म्हणजे ' फादियान इस्लाम '—' इस्लाम-चे पूजक ' — हा कट्टर धर्मनिष्ठ पक्ष, होय. ' तुदे ' पक्षाला सर्वसामान्य जनतेचा बराच पाठिंबा होता. तसा तो ' इस्लामपूजक ' पक्षाला नसला, तरी काजीमौलानांचा धर्मवेडा पाठिंबा मात्र त्यांना भरपूर आहे. या सर्वांत आजचा सत्ताधारी ' नॅशनल फ्रंट ' पक्षच लोकशाही स्वरूपाचा आहे. त्याच्या हातूनच शांततेच्या मार्गानें पायरीपायरीनें लोकसत्ता स्थिर होऊन सरंजामशाही वातावरण आणि कडक








व जुलमी जमीनदारी पद्धत या गोष्टी नाहींशा झाल्या तरच इराणचा अभ्युदय होणें शक्य आहे.

“ इराणमधील सर्व लहानमोठे पक्ष आज तेलखाणींच्या राष्ट्रीयीकरणाबद्दल एकमताचे आहेत. लोकमत आपल्याविरुद्ध आहे हें ब्रिटिशांना माहीत आहे. म्हणून ते कायदेशीर आणि विचार-विनिमयाच्या मार्गानें हा प्रश्न सोडवूं पाहात आहेत. परकी सैन्यें आखातांतून आलीं किंवा अझरबैजान-कडून आलीं, तरी त्या दोहोंविरुद्ध लोकमत प्रक्षुब्ध बनेल हें निश्चित आहे.

“ राष्ट्रीयीकरणाच्या मागणीचा सर्व गाभा इराणी पंतप्रधान डॉ. मसादिक यांच्या गेल्या डिसेंबरांतील ‘ मजलिस ’ पुढील भाषणांत आलेला आहे : ‘ ब्रिटिश सरकार आमच्या निवडणुकींत हस्तक्षेप करूनच थांबलें नाहीं, तर त्यांनीं आमच्या अधिकाऱ्यांना आपल्या हातचीं बाहुलीं बनविलीं. एवढेंहि करून संतुष्ट न होतां १९३३ सालीं जेव्हां या कंपनीच्या सवलती पुन्हां चालूं करण्याचा प्रश्न उभा राहिला, तेव्हां त्यांनीं युद्धनौका पाठवून पर्शिअन आखातांत ते घुसले. प्रत्यक्ष धमकीहि द्यायला त्यांनीं कमी केलें नाहीं. इराणी प्रजेला नोकरींत घेण्यासाठीं जी शेंकडेवारी नक्की केली होती त्यांतहि कंपनीनें पक्षपात केला. देशाच्या राज्यव्यवस्थेंत हस्तक्षेप केला आणि तेलाच्या धंद्यां-तलि फायद्याचा थोडा तुकडा तोंडावर फेंकून बाकी भाग इराणला मिळूं दिला नाहीं.’ असे आक्षेप डॉ. मसादिक यांनीं ब्रिटिशांवर केले. हा मुद्दा स्पष्ट करण्यासाठीं ते म्हणाले, ‘१९४८ च्या बजेटी वर्षांत कंपनीला ६२ दशलक्ष पौन्डांचा फायदा झाला. त्यांतील २८ दशलक्ष कंपनीनें ब्रिटिश सरकारला कराच्या स्वरूपांत दिले आणि इराणला मात्र अर्थ-मंत्री मि. गुलाम-हुसेन फरूहार यांनीं म्हटल्या-प्रमाणें, १४ लक्ष पौन्डच मिळाले, म्हणजे इंग्लंड-पेक्षां २१ पटीनें कमी मिळाले. ’

“ अँग्लो-इराणियन तेल कंपनीचें वागणें उदार-पणाचें केव्हांच नव्हतें. जगाच्या पेट्रोलचा तीस टक्के भाग या कंपनीच्या क्षेत्रांतून पैदा होतो. शिवाय या कंपनीचे २३ टक्के हितसंबंध इराकच्या खाणींत गुंतलेले आहेत. ५० टक्के हैफाच्या तेल-शुद्धीच्या कारखान्यात गुंतले आहेत, तेलवाहक नळाच्या योजनेंत मोठ्या रकमा गुंतल्या आहेत आणि १५२ तेलवाहू सागरगामी आगबोटींचा एक काफिला तिच्या मालकीचा आहे.

“ कंपनीची संपत्ति म्हणजे इराणच्या भूमींतून निघालेल्या तेलानें मिळवून दिलेल्या पैशावरील डिव्हिडंडस् होय. कंपनी जर अमेरिकन कंपन्यां-एवढीहि उदार राहिली असती, तरी हा संघर्ष टळला जाणें शक्य होतें व जागतिक शांततेवरील संकटहि त्याबरोबरच टळलें असतें.”

## “ बापूंच्या कारावासाची कहाणी ”

महात्माजींच्या चरित्र-साधनांत महादेवभाईंच्या डायऱ्यांचें आणि सुशीला नय्यर यांच्या ‘ बापूकी कारावासकहानी ’ या रोजनिशीचें महत्त्व अनन्य-साधारण आहे. सुशीला नय्यर यांची डायरी १९४२ ते १९४४ सालच्या गांधीजींच्या आगाखान-वाड्यांतील कारावासाच्या वेळची आहे. ती मुळांत हिंदींत लिहिलेली असून दिल्लीच्या ‘ सस्ता साहित्य-मंडळ ’ संस्थेनें प्रसिद्ध केली आहे व तिचा गुज-राती अनुवाद ‘ नवजीवन कार्यालया’नें अहमदा-बादहून प्रसिद्ध केला आहे.

या कालखंडाचें महत्त्व फार आहे. १९४२ सालची ‘ चलेजाव ’ चळवळ, गांधीजींची अटक व आगाखान वाड्यांत त्यांची रवानगी व त्या-नंतरच्या अनेक गंभीर घटना याच कालांत घडल्या. गुजराती आवृत्तीच्या प्रकाशकांनीं ही गोष्ट मार्मिक-पणें स्पष्ट केली आहे.

“ गांधीजींच्या शेवटच्या कारावासाचे हे एक-वीस महिने ( ऑगस्ट १९४२ ते मे १९४४ ) गांधीजींच्या जीवनांतील व हिंदुस्थानच्या स्वातंत्र्य-लढ्यांतील एक असामान्य प्रकरण होय. अटकेच्या एकवीस महिन्यांमध्यें गांधीजींच्या चरित्राशीं निगडित झालेल्या महत्त्वाच्या घटनाहि कांहीं कमी घडल्या नाहींत. त्यांतील तीन आपण पाहूं. आगा-खानराजवाड्यांत प्रवेश केल्यानंतर सातच दिव-सांनीं महादेवभाईंचें देहावसान झालें. त्या-नंतरची गांधीजींच्या २१ दिवसांच्या उपवासाची घटनाहि कांहीं कमी महत्त्वाची नव्हे; आणि शेवटीं दीर्घकालीन आजारानंतर घडलेलें कस्तुरबांचें मरण !







या काळांत गांधींच्या मनांत चाललेल्या खळबळीचें स्वरूप बाहेरच्या लोकांना केवळ कल्पनेनेंच ताडावें लागलें असतें. पण सुदैवानें त्यांच्याबरोबर सुशीला नय्यर होत्या. त्यांच्याकडून गांधीजींनीं या कारावासांतील एकवीस महिन्यांच्या एकूणएक दिवसांची डायरी लिहवून घेतली होती. वेळोवेळीं त्यांनीं ती तपासली होती. ही डायरी त्या दिवसांत गांधीजींनीं अनुभवलेल्या भाव-भावना, मनोमंथनें आणि व्यथा यांचें और चित्र डोळ्यांपुढें उभें करतें ! त्याशिवाय, आपल्याबरोबर राहणाऱ्या थोड्याच खास माणसांबरोबर त्यांनीं आपल्या जीवनतत्त्वज्ञानाबद्दल, हिंदुस्थान व जग यांतील राजकारणाबद्दल, हिंदुस्थानच्या जीवनाबद्दल व इतर अनेक प्रश्नांबद्दल केलेल्या चर्चाहि या डायरींत संग्रहीत केलेल्या आहेत. त्यामुळें अनेक प्रश्नांबद्दलचीं गांधीजींचीं मतें आपणांला निश्चितपणें समजून येतात. " इतर अनेक चर्चांत सत्ययुगाची कल्पना, ट्रस्टीशिपचा सिद्धान्त, सूतरहाट व ग्रामोद्योग, सत्ता व अहिंसा, हिंसेच्या प्रसंगीं अहिंसा, वगैरे प्रश्नांवरील चर्चा होत्या.

या डायरीची सुरुवात सुशीला नय्यरनीं केली, तो हृदयंगम प्रसंग वर्णन करतांना त्या प्रस्तावनेंत म्हणतात :

" महादेवभाईंच्या मृत्यूनंतर १५ ऑगस्टच्या रात्रीं एका मेजाच्या खणांत कांहीं कागदाचे तुकडे मिळाले. त्यावर महादेवभाईंनीं ९ ऑगस्टपासूनच्या रोजच्या मुख्य मुख्य गोष्टी लिहिल्या होत्या. त्याच कागदावर मीं १५ तारखेच्या महादेवभाईंच्या महाप्रयाणासंबंधींच्या मुख्य मुख्य घटना नमूद केल्या......२६ तारखेला सकाळीं प्रार्थनेनंतर बापू मला म्हणाले : ' महादेवभाईंच्या कामापैकीं जेवढा भार तुला उचलतां येईल तेवढा उचल. आजपासून तुला नियमितपणें डायरी ठेवावयाची आहे. लक्षांत ठेव, ही डायरी एक दिवस छापली जाणार आहे. ' "

ही डायरी कशी ठेवावी याविषयीं गांधीजींच्या कांहीं खास कल्पना होत्या असें दिसतें. २० डिसेंबर-टिपणांत पुढील संवाद आहे.

" ' तुझी डायरी वाचतां वाचतां मला वाटूं लागलें कीं, यांत येऊं नयेत अशा पुष्कळ गोष्टी आहेत. एखाद्या दिवशीं ही डायरी प्रसिद्ध होईलच. त्या वेळीं त्यांतील पुष्कळ गोष्टींचा दुरुपयोग होणें शक्य आहे. उदाहरणार्थ, व्यक्तीबद्दलची टीका. अशी टीका करण्याचा मला अधिकार नाहीं. मॉंटेग्यूनें, जे लोक भेटले व ज्यांचा परिणाम स्वतःवर झाला, त्या सर्वांची टीका आपल्या डायरींत केली आहे. ती टीका म्हणजे तरी काय ? त्या सर्वांची मजा, उपहास. माझ्या दृष्टीनें हा अविवेक असल्यामुळें वेडेपणा आहे. असें होतां कामा नये. आपल्या चळवळीबद्दल मी चर्चा करतों. त्याची नोंदहि करूं नये. कारण माझे विचार घडले जात आहेत, माझी स्वतःचीहि घडण होत आहे. तेव्हां असे अर्धवट विचार लिहून ठेवण्यांत काय अर्थ ? '

" मीं ( सुशीलानें ) म्हटलें : ' तुम्ही सांगाल तसें करायला मी तयार आहें. सांगत असाल तर लिहायचें बंद करतें. आपण जो भाग सोडून द्यायचा म्हणतां तो सोडल्यास लिहिण्यासारखें शिल्लक काय राहातें ? ऋतूंचें वर्णन ! पक्ष्यांची माहिती उत्तम लिहितां येईल. पण त्यांत मला गोडी वाटत नाहीं. आपले विचार अपुरे असले तरी असोत. पण त्यांचा विकास कसा झाला याची नोंद केलेली असावी हें बरें. छापण्याच्या दृष्टीनें नव्हे तर, आपल्यासाठीं, आमच्यासाठीं."

" बापू म्हणाले : ' तुम्ही दोघे ( सुशीला व प्यारेलाल ) विचार करून काय करणें बरें तें सांगा. मी माझे विचार तुला कळवले. तुम्हां दोघांवर त्यांचा काय परिणाम झाला तो कळल्यावर जें करणें योग्य असेल तें करीन. "

अशी ही अधिकृत डायरी आहे. तिचें परीक्षण करतांना हिंदीचे प्रख्यात पंडित श्री. बनारसीदास चतुर्वेदी यांनीं पुढीलप्रमाणें उद्गार काढले आहेत :

" या ग्रंथानें घडणारी सर्वांत मोठी सेवा ही आहे कीं,सर्वसाधारण जनतेलाहि आतां विश्वास वाटूं लागेल कीं, महात्माजी कोणी अवतार नव्हते तर, मनुष्यच होते ! ते पूर्णतेकडे नेहमीं जात होते ! सर्वांत अधिक हृदयवेधक दृश्य आम्हांला कोठलें वाटलें असेल तर तें प्यारेलालनीं महादेवभाईंच्या सुताचा हार बापूंना घातला त्या वेळचें ! त्यामुळें बापूंच्या









डोळ्यांना पाणी आलें. शेवटीं बापू तरी मनुष्यच होते ना ! "

## तिबेटांतील बहुपतित्वाची चाल

महाभारतांत जी बहुपतित्वाची चाल पांचाल-देशांतील जनतेंत रूढ असलेली आढळते तशीच ती आजहि हिमाचलप्रदेशाच्या उत्तर पहाडांत आणि जम्मू कश्मीरच्या कित्येक जमातींतहि आढळते. तिबेटांत त्या चालीचें स्वरूप काय आहे तें स्पष्ट करणारा एक छोटा लेख श्री. दाशरथि रॉय यांनीं ' टाइम्स ऑफ इन्डिया ' च्या ३ जूनच्या अंकांत दिला आहे. त्याचा सारांश असा :

" बहुपतित्वाची चाल आपणांला अनैतिक वाटते, पण तिबेटांत ती सर्रास चालू आहे. तिबेटी जनता बौद्धधर्मी आहे आणि बौद्ध धर्मांत तर बहुपतित्वाचा निषेध केलेला आहे, तेव्हां ही चाल बौद्धधर्माचा प्रसार होण्यापूर्वीची, पुरातन असली पाहिजे.

" बहुपतित्व कायम राहण्याचें कारण तिबेटी लोकांचा सनातनीपणा नव्हे, तर त्यांची आर्थिक परिस्थिति होय. तिबेटी जनता अत्यंत गरीब आहे. बहुतेक जमीन उजाड आणि रेताड आहे. घरें बांधणें फार खर्चाचें आहे व घरांच्या अभावीं बरेच लोक तंबूंतून राहतात. त्यामुळेंच वडिलोपार्जित मालमत्तेची व घरादारांची वांटणी होणें त्यांना आवडत नाहीं. कारण, तसें झाल्यास सर्वांवरच भुकेकंगालीची पाळी यावयाची. म्हणून तिबेटी लोक असें करतात कीं, बऱ्याच भावन्डांना जर एकच मालमत्ता वारशानें दाखल मिळाली, तर तिचें वांटप न करतां ते एकत्र राहतात आणि एकाच स्त्रीशीं लग्न करून संसार चालवितात. मुलें सर्वांच्या मालकीचीं असतात.

" अनेक भावांना मिळून एकच स्त्री असणें हा बहुपतित्वाचा प्रकारच तिबेटांत सर्वसाधारणपणें आढळतो. त्याला तिबेटी भाषेंत ' बाग्मा ' ( Bagma ) म्हणतात. एखाद्या कुटुंबांत मुलीच असल्या तर थोरली मुलगी वगळून बाकीच्या बहुपतित्वाच्या प्रथेप्रमाणें लग्नें करतात. पण थोरल्या बहिणीकडे कुलनामाचा आणि मालमत्तेचा वारसा येतो व मग ती हवे तेवढे नवरे करते. ते नवरे व त्यांपासून तिला झालेलीं मुलें तिचेंच कुलनाम लावतात. या तऱ्हेच्या लग्नप्रथेला तिबेटी भाषेंत 'माग्पा' ( Magpa ) म्हणतात.

" ' चामाडुंग ' ( Chamadung ) नामक आणखी एक बहुपतित्वाचा प्रकार रूढ आहे. त्यांत बाप व मुलगे यांची मिळून एकच पत्नी असते. त्या मुलांची आई मात्र केव्हांहि त्यांची पत्नी होऊं शकत नाहीं. एखाद्या कुटुंबांतील स्त्री वारल्यावर पित्यानें पुन्हां लग्न केल्यास ती नवीन स्त्री बापाची व पूर्वीच्या मुलांची संयुक्तपणें बायको होऊं शकते; तसेंच स्त्री ( मुलांची आई ) मेल्यावर मुलांनीं एकाद्या बाईशीं संयुक्त लग्न केलें तर ती बाई बापाचीहि बायको होऊं शकते.

" या ' चामाडुंग ' लग्नप्रकारांत बायको अधिकृतपणें बापाशीं लग्न झालेली असेल तर मुलें बापाचीं ठरतात, आणि मुलांशीं लग्न झालेली असेल तर मुलें मुलांचीं संयुक्त संतानें ठरतात. अशा प्रकारें विधुराचा सुनेशींच बायको म्हणून संबंध आला तर तो आपल्या कायदेशीर नातवंडाचा खरोखरचा बापहि असूं शकतो !

" बहुपति असलेल्या कुटुंबांत सर्वांत मोठा भाऊच प्रमुख असतो असें नाहीं. ज्याचें व्यक्तिमत्त्व सर्वोत्तम तो सर्वांत महत्त्वाचा. तसेंच अशा कुटुंबांत भावाभावांत असूयाच असते असें नाहीं. बहुधा कोणी तरी एक भाऊ घरीं राहतो आणि बाकीचे कामधंद्यानिमित्त फिरत राहातात.

" बहुपतिक जमातींत लग्नबाह्य अनैतिक संबंधाबद्दल कडक शासन आहे. पहिल्या, ' बाग्मा ' या लग्नप्रकारांत अनेक भावांच्या संयुक्त पत्नीनें जर व्यभिचार केला तर तिला घरांतून हाकून देतात, आणि ते भाऊ नवीन स्त्रीशीं लग्न करतात. या संबंधांतील पुरुषाला बेदम चोप मिळतो आणि त्याला कायदेशीर नवऱ्यांना नुकसानभरपाई द्यावी लागते. ' माग्पा ' प्रकारांत म्हणजे स्त्रीप्रधान लग्नांत स्त्रीनें व्यभिचार केला तरच फक्त नवऱ्याला घटस्फोट मिळतो. घटस्फोट मिळण्याची ही एकच संधि असते. "

## पहिली स्त्री-डॉक्टर

जीवनाच्या सर्वच क्षेत्रांप्रमाणें डॉक्टरीच्या व्यवसायाचें क्षेत्रहि गेल्या शतकापर्यंत स्त्रीला बंदच

होतें आणि ही गोष्ट केवळ आपल्याकडेच नव्हे, तर यूरोप-अमेरिकेंतहि शें-दीडशें वर्षांपूर्वी तशीच स्थिति होती. आपल्याकडील डॉ. आनंदीबाई जोशी यांनीं तशी पदवी मिळविली, पण तीहि त्यानंतर व अमेरिकेंतच होय. 'हेल्थ्' नामक नियतकालिकाच्या जूनच्या अंकांत पहिली स्त्रीडॉक्टर कोण, ह्याची माहिती H. F. Death यांनीं दिली आहे. त्यांत ते म्हणतातः

" अमेरिकेंत शंभर वर्षांपूर्वी पहिल्या मेडिकल विद्यार्थिनीला न्यूयॉर्कच्या जिनेव्हा कॉलेजच्या मेडिकल डिपार्टमेंटमध्यें 'पश्चिम न्यूयॉर्क संस्थानां'त प्रथम प्रवेश मिळाला. तोंपर्यंत कोणाहि स्त्रीला आधुनिक वैद्यकीय पदवी मिळालेली नव्हती. एलिझाबेथ ब्लॅकवेल यांना डॉक्टर होण्याची सूचना जणूं परमेश्वराकडूनच मिळाली. पण जिनेव्हा कॉलेजनें प्रवेश देण्यापूर्वी त्यांना आठ वैद्यकीय विद्यालयांनीं स्त्री म्हणून हुसकून लावलें. शिक्षण घेत असतांनाहि त्यांना अनेक पूर्वग्रह आणि वैरभाव यांच्याशीं झगडावें लागलें. पण अखेरीस सन १८४९ मध्यें त्यांना पदवी मिळून त्या आपल्या वर्गांत पहिल्या आल्या आणि त्यांना सहाध्यायांकडून सन्मान व गौरव लाभला.

" पुढें त्यांना सर्जन व्हावयाचें होतें, पण अमेरिकेंतील कोणतेंहि हॉस्पिटल त्यांना प्रवेश द्यावयास तयार होईना. मग त्या पॅरिसला गेल्या, पण तेथें अमेरिकेंतील पदवी मान्य होईना. शेवटीं त्यांनीं तेथें प्रसूतिशास्त्राची विद्यार्थिनी म्हणून प्रवेश मिळविला. अनेक हालअपेष्टांनंतर काम संपवून त्या अमेरिकेंत आल्या. पण कोणत्याहि सन्माननीय बोर्डिंगहाऊसमध्यें त्यांना घेत ना. तेव्हां त्यांना पैसा उभा करून घर विकत घ्यावें लागलें.

" रोग्यांची वाट पाहत त्या बसत, पण कोणी येईना. परंतु तरुण युवतींच्या ( फितींनीं आवळलेल्या ) कंबरा, त्यांचे जड कपडे, सूर्यकिरण आंत येऊं न देणाऱ्या ओढण्या, व्यायामाचा अभाव आणि तन्वंगी दिसण्यासाठीं त्यांनीं चालविलेला पक्ष्यांसारखा मिताहार या गोष्टी त्यांच्या दृष्टीस पडल्या. त्यांनीं क्वेकर परिचारिकांपुढें याबाबत व्याख्यानें देण्यास सुरुवात केली. तेव्हां त्या लोकांनीं तिच्यासाठीं न्यूयॉर्कच्या गरीब वस्तींत एक लहानसा दवाखाना उघडून दिला. सुमारें सहा वर्षें या क्वेकर डॉक्टरणीनें गरिबांत समव्यवसायी लोकांचें दुर्लक्ष सहन करीत काळ कंठला. मग तिच्या कामाच्या योग्यतेमुळें वृत्तपत्रांना व डॉक्टरी धंदा करणारांना तिच्याकडे लक्ष देणें भाग पडलें. हेन्री वार्ड बीचर या गृहस्थांनीं निधि जमा करून तिच्या कामासाठीं ' न्यूयॉर्क इन्फर्मरी ' ही स्त्रिया-मुलांची संस्था १८५७ मध्यें चालू केली, ती अजूनहि चालू आहे.

" सन १८६६ पर्यंत ह्या धैर्यशाली स्त्री-डॉक्टरानें आपल्या इन्फर्मरीच्या विद्यमानें स्त्रियांसाठीं मेडिकल कॉलेज स्थापन केलें. या वेळपर्यंत युरोपांत कॉन्टिनंटमध्यें स्त्री-विद्यार्थ्यांना मेडिकल कोर्स घेतां येऊं लागला होता आणि त्यांना कॉलेजांत प्रवेशहि मिळूं लागला होता. पण स्त्री-डॉक्टरांविरुद्ध असलेला पूर्वग्रह इंग्लंडमधून जातां जाईना. म्हणून आपलें काम जबाबदार सहकाऱ्यांवर सोंपवून ह्या बाई इंग्लंडांतील भगिनींच्या मदतीस निघाल्या.

" त्यांच्या आगमनानंतर कांहीं महिन्यांनीं एडिंबरो युनिव्हर्सिटीच्या मेडिकल कोर्सला गेलेल्या सात स्त्रियांवर क्रुद्ध जमावानें हल्ला केला आणि दगडफेक केली. त्या सात जणींना वृत्तपत्रें ' निर्लज्ज सातजणी ' या टोपण नांवानें उल्लेखीत ! स्त्रियांसाठीं स्वतंत्र मेडिकल कॉलेज काढण्याची बाईंना विनंति करण्यांत आली आणि त्यांतूनच ' लंडन स्कूल ऑफ मेडिसिन् फॉर वुइमेन ' ही संस्था अस्तित्वांत आली.

" प्रतिबंधक औषधें वापरून रोगनिवारण करावें असें बाईंचें मत होतें. फॉस्फरसमुळें पीडलेल्या आगपेट्यांच्या कारखान्यांतील कारागीर, चिंध्या गोळा करतांना संसर्गजन्य रोगांनीं पछाडलेले लोक, तसेंच खेळती हवा नसलेल्या बंदिस्त जागेंत कपडा तयार करणारे विणकर-शिंपी वगैरेंच्या दुःखांबद्दल या बाईंनीं लिहिलें आहे. आजारपण व म्हातारपण यांसाठीं विमायोजना चालू करण्याबाबत चळवळ करणारांत या बाई प्रमुख होत्या, तसेंच राहण्याच्या उत्तम सोयी करणें व पौष्टिक आहाराचा खर्च सहकारी तत्त्वानें कमी करणें यासंबंधांतहि त्या चळवळ करीत होत्या. "








अनुक्रमणिका








Regd. No. B. 5177



अनुक्रमणिका





